पुणें विद्यापीठ



बहिःशाल शिक्षण मंडळ


बहिःशाल शिक्षण ग्रंथमाला

संपादक

डॉ. अ. वि. नाईक, एम्. ए., पीएच्. डी.

सचिव, बहिःशाल शिक्षण मंडळ,

गणेशखिंड, पुणें ७.


# घाटावरील श्रमिकांचीं लोकगीतें


लेखिका

सौ. अनसूया लिमये, बी. ए., बी. टी.



एप्रिल १९५४ ]                    [ मूल्य अडीच रुपये

# निवेदन

या पुस्तिकेंतील लोकगीतें मीं १९३९–४० सालीं मुंबई लेबर ऑफिसच्या वतीनें मजुरांची पहाणी करीत असतांना जमा केलीं. मुंबई युनिव्हर्सिटी जर्नल ( १९४१–४२ ), महाराष्ट्र साहित्य पत्रिका ( वर्ष १४ व १५ ) व साधना ( १९५० ) यांतून माझ्याजवळील ओंवीगीतांचा संग्रह मीं प्रसिद्ध केला. ओंवीगीतांव्यतिरिक्त गीतें माझ्याजवळ बरेच दिवस तशींच होतीं. पुणें विद्यापीठाच्या बहिःशाल शिक्षण मंडळाचे वतीनें प्रथम मला हा संग्रह व्याख्यानरूपानें लोकांसमोर मांडण्याची संधि मिळाली. आतां तर तो संग्रह त्याच मंडळाकडून पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे.

आतांपर्यंत झालेल्या लोकवाङ्मयाच्या महत्त्वाच्या संग्रहाची सूची या पुस्तकाच्या परिशिष्टांत दिलीच आहे. माझाहि अल्पसा संग्रह मीं पुस्तकरूपानें पुढें ठेवला आहे. असे आणखी कितीतरी संग्रह अद्याप पुढें येणें आवश्यक आहेत. श्री. दुर्गा भागवत यांनीं या विषयांतील सखोल अभ्यास करण्याचा प्रयत्न चालविला आहे. हिंदुस्थानांतील प्रांतोप्रांतींचें लोकवाङ्मय जर संग्रहित झालें, रूपांतरित झालें तर त्याच्या अभ्यासावरून समाजेतिहासाचा अभ्यास करण्यास पुष्कळच मदत होईल यांत शंका नाहीं. संस्कृतीचें भ्रमण कसें झालें, निरनिराळ्या प्रांतांतील संस्कृतींत साधर्म्य काय, फरक काय, तो फरक कां असावा, कोणत्या संस्कृतींचे परिणाम कुणावर कसे झाले, हा समाजशास्त्राच्या अभ्यासाचा एक व्यापक विषय आहे. हिंदुस्थानचेंच काय पण जगाचें वाङ्मय जर संग्रहित व रूपांतरित झालें तर या विषयांची व्याप्ति मानवतेच्या व्यापक इतिहासाकडे वळेल. प्रांतांचें व देशांचें त्याप्रमाणें वेगवेगळ्या जमातींचेंहि वैशिष्ट्य यांतून अभ्यासतां येईल. उदाहरणार्थ, कै. माने गुरुजींचा " स्त्री–जीवन " हा ब्राह्मण स्त्रियांच्या ओवींगीतांचा संग्रह, सौ. मालतीबाई दांडेकरांचा " लोकसाहित्याचीं लेणीं " हा मराठमोळ्या स्त्रियांच्या वाङ्मयाचा संग्रह व माझ्या " महाराष्ट्र–साहित्य पत्रिकेंतून " प्रसिद्ध झालेला प्रामुख्यानें महारांच्या वाङ्मयाचा संग्रह या तिहींचा अभ्यास करून समाज-अभ्यासकाला

त्यांतून खोलवर जातां आलें तर प्रयत्न करण्यासारखा आहे. खोलवर अभ्यासाकरितां जुन्या वाङ्मयाचा व इतिहासाचा अभ्यास करण्याचीहि आवश्यकता आहे. भाषाशास्त्राचाहि अभ्यास पाहिजे. तो कांहीं अंशीं विद्वानांचा प्रांत होईल. परंतु आज सामान्य अभ्यासकांना व जनतेंत वावरणाऱ्या समाजसेवकांना या वाङ्मयांचा संग्रह करून प्रसिद्ध करण्याचें काम तरी करतां येण्यासारखें आहे. असा पुष्कळ संग्रह सर्व भागांतून झाल्याशिवाय अभ्यासकांना तरी साधन कोणतें मिळणार ? असो.

· लोकगीतांचा माझा संग्रह 'बहिःशाल शिक्षण ग्रंथमाले'तील एक प्रकाशन म्हणून प्रसिद्ध केल्याबद्दल पुणें विद्यापीठ व बहिःशाल शिक्षण मंडळ यांची मी अत्यंत ऋणी आहें. बहिःशाल शिक्षण मंडळाचे माजी सचिव श्री. ना. अ. गारे, आजचे सचिव श्री. अ. वि. नाईक, सदस्य श्री. चिं. ग. कर्वे व श्री. ना. ग. गोरे या सर्वांनीं या ग्रंथाचें कामीं मला अनेक सूचना देऊन बहुमोल साहाय्य केलें याबद्दल मी त्यांचीहि आभारी आहें. माझे एक नुकतेच दिवंगत झालेले मित्र व मराठी साहित्याचे उपासक कै. वि. द. साठे यांनीं वारंवार दिलेल्या उत्तेजनामुळेंच माझे हातून हें काम पार पडलें; म्हणून त्यांचा व ज्यांचे सहवासामुळें प्रथम मला या विषयांत गोडी निर्माण झाली त्या श्रीमती दुर्गा भागवत यांचा या ठिकाणीं उल्लेख करणें माझें कर्तव्य आहे. अशिक्षित वर्गांतील ज्या अनेक मजूर व खेडूत बंधुभगिनींनीं हीं गीतें मला म्हणून दाखवलीं त्यांचें सहकार्य मला प्रथमपासून मिळालें नसतें तर हा संग्रह वाचक-वर्गापुढें ठेवणें मला शक्यच झालें नसतें. म्हणून शेवटीं त्या अप्रसिद्ध अशा सर्व व्यक्तींचेहि मनःपूर्वक आभार मानतें.

**अनसूया लिमये**

---

# अनुक्रमणिका


| | | | पृष्ठें |
| --- | --- | --- | --- |
| लोकवाङ्मय | ... | ... | १— ३० |
| नागपंचमीच्या फेरावर | ... | ... | १— २६ |
| पौराणिक कथा-गीतें | .. | ... | २६— ६८ |
| स्त्रियांचे खेळ | ... | ... | ६८— ८० |
| शिमगा | ... | ... | ८१— ९४ |
| लग्नांतील गाणीं | ... | ... | ९४—१२७ |
| डोहाळे व पाळणे | ... | ... | १२७—१३९ |
| बायांचीं गाणीं | ... | ... | १३९—१४५ |
| परिशिष्ट १ | ... | ... | १४७—१५१ |
| परिशिष्ट २ | ... | ... | १५१—१५२ |
| परिशिष्ट ३ | ... | ... | १५२—१५६ |

# शुद्धिपत्र

प्रस्तावना पान ६ पायटीप—" पूर्वी प्रसिद्ध केलेल्या लेखांची सूचि... " हें परिशिष्ट जागेच्या अभावीं घातलेलें नाहीं

| | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| पान ३ — ओळ | ९ : तिच्य | — तिच्या |
| — पायटीप ओळ | ८ : गात | — गीत |
| पान २६ — ओळ | ६ पाराणिक कथा-गीतें | — पौराणिक कथा-गीतें |
| पान २६ — ओळ | १५ — होवूं | — होवूं |
| पान २६ — ओळ | २० — रविलावि | — रचिलाचि |
| पान ३२ — ओळ | १९ — टाक | — ठोक |
| पान ३५ — ओळ | २३ — बोळबण | — बोळवण |
| पान ३८ — ओळ | २७ — ।वकावें | — विकावें |
| पान ४४ — ओळ | १ — कोमलो | — कोमेला |
| पान ४६ — ओळ | ९ — पलग | — पलंग |
| पान ६० — ओळ | २ — स्वानुभुव | — स्वानुभव |
| पान ६५ — ओळ | २१ — हावादावो | — हेवादावा |
| पान ७३ — ओळ | २४ — घोनता | — घोनतां |
| पान ८४ — पायटीप | — मजुराताल | — मजुरांतील |
| पान ८७ — पायटीप | — साकटाचा | — सोकटाचा |
| पान १०३ — पायटीप | — अह्व | — अहेव |
| दान ११२ — ओळ | १२ — नेत्य | — नेत्या |
| पान ११६ — ओळ | ४ — ।वहीण | — विहीण |

---

# घाटावरील श्रमिकांचीं लोकगीतें

## प्रस्तावना

## लोकवाङ्मय

शहरापासून दूर एकाद्या खेड्यांत वस्ति केली तर, पहांटेच्या वेळीं जात्यावर आळविल्या जाणाऱ्या मंजुळ ओवीगीतांनीं आपल्याला जाग येते आणि तीं गीतें ऐकत कांहीं वेळ तसेंच पडावें असेंहि वाटतें. कधीं कधीं त्या गीतांतील गोड भावना मनाला क्षणभर आनंदित करतात तर कधीं कधीं त्यांत व्यक्त झालेली हुरहूर आपल्याहि हृदयाला क्षणभर बेचैन करून टाकते. पण या पलीकडे या ओवीगीतांची अधिक कांहीं किंमत आहे किंवा या गीतांचें संकलन झालें तर त्यांतून विशेष कांहीं मिळणार आहे असें आपल्याला पूर्वी कधीं वाटलें नाहीं. नवरात्रांत घरांतील व आस-पासच्या मुलीबाळी जमून भोंडला खेळूं लागल्या म्हणजे, मुलींचा खेळ म्हणून आपण कौतुकानें पाहिला तरी त्यांच्या 'ऐलमा पैलमा'सारख्या निरर्थक गाण्यांना आपण मनांतल्या मनांत हसतच असूं. नागपंचमीला खेडूत स्त्रिया धरीत असलेला फेर तर आपल्याला कधींच आकर्षक वाटला नाहीं, कारण त्यांत नृत्यलालित्यहि नसतें व गेयताहि विशेष नसते. उलट त्यांच्या गाण्यांची लांबण जर कधीं ऐकलीच तर वाटतें "काय लावलं आहे चऱ्हाट!" भुताखेतांच्या गोष्टींतील अद्‌भुतता ऐकण्यांत कुतूहल वाटलें, तरी शेंवटीं आपण त्यांचा उपहासच करतों. पण हें सगळें देखील एक वाङ्मयच आहे याची जाणीव साहित्यिकांना व अभ्यासकांना अलीकडे व्हावयाला लागली व या वाङ्मयाचें संकलन केलें पाहिजे ही गोष्टहि आतां सर्वमान्य झाली. या वाङ्मयास "लोकवाङ्मय" किंवा "लोक-साहित्य" हें नामाभिधानहि प्राप्त झालें.

**लोकवाङ्मय म्हणजे काय?** :—लोकवाङ्मय कशाला म्हणावें? लोकवाङ्मयाची बरोबर व्याख्या काय? 'लोक' हा शब्द आधुनिक

युगाचा ध्येयबिंदु आहे. ‘ लोकशाही ’ची व्याख्या ज्याप्रमाणें ‘ लोकांचें, लोकांनीं चालविलेलें व लोकांसाठीं राज्य ’ अशी केली जाते त्याप्रमाणें लोकवाङ्मय म्हणजे ‘ लोकांनीं, लोकांसाठीं व लोकांसंबंधीं लिहिलेलें वाङ्मय ’ अशी गैरव्याख्या होण्याचा संभव आहे. अशा तऱ्हेचा एक ओझरता उल्लेख सौ. मालतीबाई दांडेकर यांच्या “ लोकसाहित्याचें लेणें ” या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत आलाहि आहे. लोकशाहीची व्याख्या वरीलप्रमाणें करणें योग्य होईल. कारण लोकशाही हें त्या कसोटीला लावून तयार केलेलें राज्यतंत्रच आहे. पण लोकवाङ्मयाचें महत्त्व आपल्याला आधुनिक काळांत समजलें या पलिकडे आधुनिकतेचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. उलट लोकवाङ्मय हें फार पुरातन कालापासून चालत आलेलें वाङ्मय आहे. भाषाशास्त्र, छंदःशास्त्र, काव्यशास्त्र या कुठल्याहि शास्त्राचा शोध लागण्या-पूर्वींपासून लोक हें वाङ्मय निर्माण करीत आले असले पाहिजेत. मग या लोकवाङ्मयाचें स्वरूप तरी काय? त्याचीं वैशिष्ट्यें कोणतीं? लोकवाङ्मय म्हणजे लोकांनीं निर्माण केलेलें वाङ्मय. ज्या वाङ्मयाला खास व्यक्तिगत कर्ता नाहीं तर जें लोकांच्या सामूहिक भावनांतून व अनुभूतींतून निर्माण झालें आणि परंपरेनें श्राव्य अगर बोली स्वरूपांत चालत आलें तें लोक-वाङ्मय होय. ओवीगीतांची रचना हें याचें एक उत्तम उदाहरण आहे. जात्यावर दोन किंवा अधिक स्त्रिया दळावयाला बसल्या म्हणजे आपल्या परिसरांतील एकादा विषय घेऊन एक स्त्री त्यावर ओवी रचते, तिचाच धागा दुसरी उचलते व दुसरी ओवी रचते, एकदां ‘ काळी चंद्रकळा ’ यावर ओव्या सुरू झाल्या कीं त्यावरच त्या रचल्या जातात. मध्येंच एकादी स्त्री धागा बदलते व दुसरा विषय सुरू होतो. भोंडल्यासारख्या गाण्यांतून कधीं कधीं जी निरर्थकता व असंबद्धता आढळते त्याचेंहि कारण हेंच असावें. एक चरण एका स्त्रीनें विशिष्ट हेतूनें रचला व दुसरीनें भलताच धागा उचलून तो पुढें नेला तर असंबद्धता निर्माण होण्याची शक्यता आहे. अर्थात कांहीं वेळां गाण्यांतील अध्याहृत अर्थ न समजल्यानें किंवा कांहीं भाग काळाच्या प्रवाहांत गमावल्यानेंहि असंबद्धता आल्यासारखी वाटते हें मान्य केलें पाहिजे. लोकवाङ्मयाची निर्मिती लोकांनीं केलेली

असते. याचा अर्थ व्यक्तीव्यक्तींचा तें रचण्यांत भाग असला तरी पंडिती वाङ्मयाप्रमाणें विशिष्ट व्यक्तीच्या व्यक्तिमत्वाचा किंवा अनुभूतीचा ठसा त्यावर पडलेला नसतो. 'एकच प्याला' नाटकावर जशी गडकऱ्यांच्या व्यक्तिमत्वाची, त्यांच्या जीवनाची किंवा त्यांच्या विचारांची छाप असेल तशी लोकवाङ्मयाचे बाबतींत आपणांस दाखवितां येणार नाहीं.

खऱ्या वाङ्मयाचा मूळ उगम मनुष्याच्या भावना व त्याची तळमळ किंवा उद्रेक यांत असतो. लोकवाङ्मयाचे बाबतींत तर हा हेतु अधिकच शुद्ध स्वरूपांत असला पाहिजे. पंडिती वाङ्मयाची निर्मिति होऊं लागल्यानंतरच्या भौतिक जगांत पैसा, लोकप्रियता, अहंमन्यता इत्यादि हेतुहि वाङ्मयरचनेमागें लागले व वाङ्मयाची शुद्धता संशयातीत राहिली नाहीं. कारण[redacted]ीकडील वाङ्मय 'लोकांकरितां' रचलें जाऊं लागलें. पण लोकवाङ्मय हें लोकांनीं रचलेलें वाङ्मय असलें तरी लोकांकरितां रचलेलें नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. भावनांचा आविष्कार हाच या वाङ्मयामागील हेतु. त्यामुळें त्यांत मोकळेपणा व प्रामाणिकपणा अधिक. मानवी मनाचें स्वच्छ प्रतिबिंबच जणुं या वाङ्मयाच्या आरशांत दिसत असतें. लग्नासारख्या आनंदाचे प्रसंगीं व मर्तिकासारख्या दुःखाचे प्रसंगीं दोन्ही वेळां भावनांचा उद्रेक होतो, म्हणून दोन्ही प्रसंगीं गीतें रचलेलीं आढळतात. वाङ्मय-निर्मितीमागील दुसरा हेतु श्रमपरिहार किंवा मनोरंजन हाहि असतो. विशेषतः काव्यनिर्मितींतून व गाण्यांतून माणसाचे श्रम हलके होत असतात, किंवा श्रमाचा परिहार होत असतो. झोपाळ्यावर बसून ओव्या म्हणणाऱ्या मुली आपलें मनोरंजन करीत असतात, तर जात्यावर ओव्या गाणाऱ्या स्त्रिया आपले श्रम हलके करण्याचा प्रयत्न करीत असतात. दिवसभराच्या कामानें थकून गेलेला खेड्यांतील शेतकरी रात्रीं शेकोटीभोंवतीं बसून गोष्टी सांगतो तेव्हां आपल्या श्रमाचा परिहारच करीत असतो शेतांत मोट हांकणारा शेतकरी "माझ्या बैला होऽऽ" अशी कांहींतरी गेय आरोळी देतो तोहि आपले श्रम हलके जावेत म्हणूनच. पुष्कळदां व्रतवैकल्यें व संस्कारविधी यांच्याशींहि वाङ्मय संलग्न झालेलें आढळतें. स्त्रियांच्या सर्व व्रतांच्या कहाण्या या अशा निर्माण झालेल्या असतात. काळाच्या धांवत्या

प्रवाहांत अशा तऱ्हेच्या गाण्यांनीं अथवा वाङ्मयामुळें व्रतवैकल्यें टिकाऊ बनत असतात.

**पंडिती वाङ्मय आणि लोकवाङ्मयः**—वरील सर्व अर्थानें तरी या जुन्या वाङ्मयास 'लोकवाङ्मय' म्हणणें बरोबर ठरेल कां हाहि प्रश्नच आहे. ज्यांचा कर्ता आपल्याला माहीत नाहीं व ज्यांतून सामान्यपणें लोकांच्या सामूहिक भावना आपल्याला दिसतात त्या जुन्या अलिखित वाङ्मयाला आपण 'लोकवाङ्मय' म्हटलें, व मुद्रणकला व शिक्षणप्रसार झाल्यानंतर लिहिल्या गेलेल्या वाङ्मयाला पंडिती वाङ्मय म्हटलें व हे दोन सर्वस्वी भिन्न प्रकार आहेत म्हणून दोघांमध्यें भिंत घालण्याचा प्रयत्न केला तर अशी भिंत घालणें आपल्याला शक्य होणार नाहीं. ज्या अर्थानें 'पंडिती-वाङ्मय' हा शब्दप्रयोग लोकवाङ्मयापासून विभक्तता दर्शविण्यासाठीं आपण रूढ करूं पाहतों त्या वाङ्मयांत आज पैशाकरितां लिहिलें जाणारें रहस्य-कथांसारखें वाङ्मय, लोकप्रियता मिळविण्यासाठीं लिहिल्या जाणाऱ्या चालू प्रश्नांवरील कथा किंवा आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रचार करण्याकरितां लिहिलें जाणारें प्रचारकी वाङ्मय हें सर्व बसूं शकतें कां, हा प्रश्न आहे. त्याचप्रमाणें उलट पंडिती वाङ्मयाचे गुण म्हणजे उच्च प्रतीची कल्पकता, उपमा, अलंकारादि काव्यसौंदर्य हे कित्येकदां लोकवाङ्मय म्हटल्या जाणाऱ्या वाङ्मयांतहि दिसून येतात. विशेषतः कल्पनांचा विलास व उच्च प्रकारचे काव्यगुण हे ओवीगीतांतून फारच चांगले आढळतात. मग विशिष्ट स्त्रीच्या कल्पकतेचाच तो ठसा असें कशावरून नाहीं ? या वाङ्मयांतून कित्येकदां संतांच्या भक्तिमार्गाचा प्रभाव तर कित्येकदां शाहिरी वाङ्मयाचा प्रभाव दिसतो. वारकरी कुटुंबां-तील स्त्री गाणें रचते तेव्हां तिचें वाङ्मयावर भक्तिमार्गाचा प्रभाव किंवा शाहिराच्या घरांत वावरणारी स्त्री गाणें रचते तेव्हां तिच्या गीतावर शाहिरी वाङ्मयाचा प्रभाव होत असावा असेंच म्हणावें लागेल. म्हणजे यांतहि व्यक्ती-व्यक्तींच्या बुद्धीची छाप आहेच. म्हणूनच लोकवाङ्मय व पंडिती वाङ्मय यांच्यामध्यें भिंत निर्माण करणें योग्य ठरणार नाहीं. कवि सोपानदेव चौधरी यांच्या मातोश्री बहिणाबाई यांनीं निर्माण केलेलें वाङ्मय नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. तें लोकवाङ्मयासारखेंच आपणांला वाटेल, याचें कारण सामान्य

स्त्रियांच्या जीवनांतल्या अनुभवांची पकड घेण्याची समभावना बहिणाबाईंचे-पाशीं होती.

## लोकवाङ्मयाचें महत्त्व

(१) **समाज-इतिहासाच्या अभ्यासास मदत**:—आतांपर्यंत दुर्लक्षिलेलें हें सारें वाङ्मय संकलन करून व जतन करून ठेवण्याची आवश्यकता आतांच कां वाटूं लागली? छापण्याची कला, शिक्षणाचा प्रसार आणि इतर साऱ्या सुधारणांबरोबर हें वाङ्मय नष्ट होत चाललें. पंडिती वाङ्मयानें याची जागा घेतली. खेड्यापाड्यांत देखील पिठाची गिरणी जाऊन पोंचल्यानंतर रोज पहांटे जातें ओढण्याचा प्रश्न मिटला व जात्यावर बसलें म्हणजे सुचणारी ओंवीदेखील नष्ट होत चालली. प्रौढ विवाह सर्रास होत चालले तसतशीं न्हाणुलीचीं गीतें मागें पडलीं. नव्या सुधारणांबरोबर लग्नासारख्या विधींतून सुटसुटितपणा येत चालला व पारंपारिक अंध रुढींना फांटा मिळाला. त्यामुळें त्यावरचीं गीतेंदेखील लोकांनीं सोडलीं. आजीबाईच्या आणि भुताखेताच्या गोष्टी सांगायला-देखील या नव्या औद्योगिक जगांत लोकांना फार थोडी फुरसत मिळते. शिवाय छापील वाङ्मय लोकांची गरज भागवूं लागलें. त्यामुळें श्राव्य वाङ्मय हळूंहळूं नष्टच होत चाललें. आणखी एक-दोन पिढ्या गेल्यावर हें वाङ्मय नवें निर्मिलें तर जाणार नाहींच पण जुनेंहि कुणाला पाठ येणार नाहीं! म्हणूनच आतांच याचा संग्रह करण्याचें महत्त्व आपण जाणून घेतलें पाहिजे.

केवळ एक जुनी परंपरेंतील चीज म्हणूनच या वाङ्मयाचें जतन करावयाचें कां? नाहीं. लोकवाङ्मय हीं केवळ वस्तुसंग्रहालयांत ठेवण्याची चीज नाहीं. समाजशास्त्र आणि भाषाशास्त्र या दोन्ही दृष्टींनीं लोकवाङ्मयाचें धन हा एक अमोल ठेवा आहे. लोकवाङ्मयांतून झालेला जनमनाचा आविष्कार हा अधिक सत्य व प्रामाणिक असणार हें वर सांगितलेंच. समाजांतील रूढि, चालीरीति, प्रचलित भावना, कुटुंबांतील संबंध, समाज-जीवन इत्यादींचें कमी अधिक चित्रीकरण या वाङ्मयांतून झालेलें दिसेल. अर्थात् समाजाच्या ऐतिहासिक विकासाचा पूर्णत्वानें अभ्यास यांतून करतां

येईल हें कधींच शक्य नाहीं. थोड्याथोडक्या संग्रहावरून तर हें मुळींच जमणार नाहीं. आधींच कितीतरी पारंपारिक रूढि, चालीरीति, व्रतसंस्कार काळाचे ओघांत गडप झालेले असणार, कांहींना अगदींच निराळें वळण मिळालें असण्याचाहि संभव. अशा परिस्थितींत समाज-जीवनाचा पूर्ण अभ्यास यांतून कसा मिळणार? परंतु समाज-जीवनाच्या अभ्यासास ज्या अनेक साधनांचा उपयोग होईल त्यांतच एक स्थान लोकवाङ्मय, लोकरूढि यांना मिळूं शकेल. व तेंहि या वाङ्मयाचें संकलन ज्या वेळीं पुष्कळसें होईल त्या वेळींच. नाहींतर एकदां ' काळी चंद्रकळा ' वर ओव्या निर्माण होऊं लागल्या म्हणजे प्रास व यमक जुळविण्याकरितां ' काळी चंद्रकळा, रुपये दिलेत साडे सोळा ' अशी रचना सांपडेल, तर एकदां ' रुपये दिलेत हजार ' अशीहि रचना सांपडेल. परंतु पुष्कळशा संकलनानंतर मात्र कांहीं गोष्टींच्या अभ्यासास खास मदत होईल. या वाङ्मयांतून प्रामाणिकपणा अधिक असेल ही गोष्ट जितकी खरी तितकेंच त्यांत सूक्ष्मपणा व मार्मिकता कमी सांपडेल हेंहि खरें. सर्वसाधारण ठोकळ व ढोबळ गोष्टींच्या अभ्यासास त्यांतून मदत होईल.

**पारंपारिक उपजीविकेचा आधार**—या वाङ्मयाला पारंपारिक उपजीविकेचा पायाभूत आधार मिळालेला आपल्याला दिसेल व समाजेतिहासाच्या अभ्यासाला तो निश्चितच उपयोगी पडेल. हिंदुस्थानचें सारें जीवन हें कृषिप्रधान आहे आणि तेंच लोकवाङ्मयाचा मूळ आधार आहे. खेडूत शेतकऱ्याचा दिनक्रम व त्यांतील निरनिराळे प्रसंग हे या गीतांचे विषय असतात. माळ्याच्या मळ्याचा उल्लेख करून तर शेंकडों ओंव्या[1] रचलेल्या आढळतात.

**" माळ्यानं केला मळा, बंधुनीं केल्या केळीं ।**
**लिंबुणीला आली करी, पलाणीला सीताफळी ।**
**उंच गेलीया नारळी ॥ "**

---

१ ओवीगीतांचा विभाग मीं पूर्वीच प्रसिद्ध केला असल्यानें या संग्रहांत तो पुन्हां घेतलेला नाहीं. नमुन्यादाखल कांहीं ओंव्या प्रस्तावनेंत आधारासाठीं घेतल्या आहेत. पूर्वीं प्रसिद्ध केलेल्या लेखांची सूचि शेवटीं परिशिष्टांत आलीच आहे.

अशा वर्णनपर ओंव्या भावावरून गाईलेल्या सर्वत्र मिळतील. उपमा देतांनाहि शेतीच्या जीवनांतील गोष्टी घेतलेल्या आढळतील.

**“ सावळ्या सुरतीकडं नार बघती भरभरा ।**
**माझा बंधुराया कवळा राजीगरा ॥ ”**

किंवा

**“ संगत कर नारी शिण पाहुनी कवळी ।**
**माझा बंधुराया लिंबं झाडाला पिवळीं ॥ ”**

गोपजीवन हाहि कृषिजीवनाचाच एक महत्त्वाचा भाग; म्हणूनच गाईचें पावित्र्य निर्माण झालें. बहुळा गाईचें गाणें हें याचेंच द्योतक आहे. हिंदुस्थानच्या शेतकऱ्याच्या जीवनांत पावसाळ्याचें महत्त्व मोठें, म्हणून पावसाळ्यांतच आपले अनेक सण व व्रतें येतात. नागपंचमीच्या सणाचें शेतकरी जीवनांतील महत्त्व पावसाळ्यांतीलच आहे.

शेतीच्या जीवनाबरोबरच शहरी संस्कृति व शहरी जीवन सुरूं होतांच गिरणींतील काम हाहि गाणारीचा विषय होऊं लागला आणि आगगाडी-वर काम करणाऱ्या मजुराचाहि उल्लेख होऊं लागला.

**“ चालली गिरणबाई चाल तुझी अवखळ ।**
**माझ्या बंधवाची बाजुवाल्याची तारांबळ ॥ ”**
**“ आली आगीनगाडी दिसती काळीनिळी ।**
**बंधुनं ढासळली शिगनळा तुझी फळी ॥ ”**

पुरुषांच्या व्यवसायावरून ज्याप्रमाणें गीतें निर्माण केलीं गेलीं त्याप्रमाणें तीं रचणाऱ्या स्त्रियांनीं स्वतःच्या व्यवसायाचेंहि भरपूर चित्रीकरण केलेलें आढळेल.

" पहाटचं दळाण शिरवेळाचं[1] शेणपाणी ।
माझी मायबहीण काम झालं गवळणी ॥ "
" दळण भाकरी माझं तऱ्हांच न्हायाचं ।
अवघड वाटतं मला पाण्याला जायाचं[2] ॥ "

किंवा

" सकाळीं उठोनी नांव घ्यावं त्या रामाचं ।
धरण्या मातेवरी मंग पाऊल नेमाचं ॥ "
" सवा सांज झाली दिवा लाव सवाषिणी ।
माझ्या बंधवाच्या गाया आल्यात मोकाशिणी[3] ॥ "

**कौटुंबिक व सामाजिक भावनांचें दर्शन** :—व्यवसायजीवन हा या वाङ्मयाचा पाया असला तरी त्यांतून कुटुंबांतील नातलगांच्या परस्पर भावना चांगल्या व्यक्त झालेल्या दिसतील. समाजाच्या संस्कृतीला बुद्धि-वादाचा पाया मिळण्यापूर्वी कुटुंबांतील व समाजांतील मानवांचे परस्पर संबंध व भावना यांवर रूढीचा फार मोठा प्रभाव झालेला आहे असें आढळून येईल. सून ही परक्या घरची म्हणून सासूनें तिला सासुरवास करावयाचा हें ठरलेलेंच. भावजय ही पण परक्या घरांतली व नणदेच्या बरोबरची म्हणून नणंदाभावजयांनींहि परस्परांचा द्वेष करावयाचा ही परं-परेनें ठरून गेलेली रूढीच. ' बाळाई[4] ', ' भारंजा ', ' जैता[5] ' किंवा ' गंगू-सोनू[6] ' यांसारखीं कथागीतें हीं या परंपरेवरच आधारलेलीं आहेत. " सून

---

( १ ) शांत वेळेचें. ( २ ) पूर्वीपासून महाराष्ट्रांतील खेड्यांत पाण्याची टंचाई. स्त्रियांना लांब पाण्याला जावें लागे हें स्पष्ट दिसतें. तसेंच पाण्याला जातांना परपुरुषांसमोरून जावें लागतें हेहि सुचविलें आहे. ( ३ ) मोकाशी=गांव ज्यास इनाम आहे असा किंवा वसुली करणारा शेतकरी. भावाच्या गायींना गौरवानें मोकाशिणी म्हटलें आहे.

सोसावी लेकासाठीं " हें सुनेबाबतच्या भावना दर्शविणारें सामान्य प्रतीक असलें तरी

" सून मी करीतें लेकापरास देखणी ।
घरांत वागवीतें माझी दौत लेखणी ॥ "

असें सुनेचें कौतुक करणारें एकादें गीतहि मिळूं शकतें.

गेल्या हजारों वर्षातील हिंदुस्थानच्या स्त्रीची जी कौटुंबिक भूमिका आहे त्यावरूनच तिच्या निरनिराळ्या नातलगांबद्दलच्या भावना सामान्यपणें तीव्र झालेल्या दिसतील. विशेषतः ओवीगीतांतून याचें चित्रीकरण फारच उठावदारपणें झालें आहे. लग्न म्हणजे काय हें समजण्यापूर्वीच सासरीं जाणाऱ्या बालेला माहेरचा ओढा लागून रहावा व सासरबद्दलचा रोष निर्माण व्हावा हें साहजिकच. त्यांतून सासूसुनांचे परस्पर संबंध या भावनांना अधिकच तीव्रता आणतात.

" असं माहेर गोड बाई खेळाया धाडीतें ।
असं सासर दोड बाई कोंडून मारीतें ॥ "

या ओळी म्हणजे स्त्रीच्या गेल्या हजारों वर्षांच्या जीवनाचें प्रतीक आहेत. म्हणूनच या गीतांतून माहेरच्या नातलगांबद्दल अतिशय आस्थेनें गाइलेलें आढळेल व 'सासूचा उंबरा कधीं मला सुटेल ? म्हणून प्रश्न केलेला दिसेल. आईवडिलांबद्दलच्या प्रेमादराच्या भावना, अपत्याबद्दलचें वात्सल्य व भावाबद्दलचा अलोट स्नेह लोकगीतांतून सर्वत्र विखुरलेला दिसेल. विशेषतः भाऊ हा लोकगीतांचा सर्वांत अधिक लोकप्रिय विषय झालेला असतो. लहानपणीं लग्न होऊन बहीण सासरीं जात असली तरी प्रथमपासून भावाची भूमिका तिच्या जीवनांत महत्त्वाची असते. माहेरीं तो तिचा सोबती असतो, सासरीं

गेल्यावर मुलीला माहेरीं नेण्याकरितां ‘ मूळ ’ आणणारा मुऱ्हाळी[1] भाऊच असतो. म्हणून ती भावाच्या वाटेकडे डोळे लावून बसलेली असते. मोठेपणीं भावाशीं बहिणीचें एक नवीनच नातें निर्माण होतें. भावाची मुलगी व बहिणीचा मुलगा यांचें लग्न करण्याची प्रथा बऱ्याचशा जमातींतून रूढ आहे. म्हणजे भाऊ बहीण हीं व्याहीविहीण होत असतात. एकंदरींत भावावरून अगणित गीतें रचलेलीं आढळतात. भाऊ हा नेहमीं तरुण स्त्रियांचें मन आकर्षून घेत असतो अशीं वर्णनें तर असतातच पण भाऊ कलावंतिणींच्या नादीं लागला तरी तो हौशी म्हणून त्याचें गुणगानच होत असतें. खालील दोन ओव्या पहा.

**“ चंचाळ नारीची हिची नजर चळली ।**
**बंधूला देखून डाळ दुधांत येळीली ॥ ”**
**“ जातीची कळवातीण भल्याभल्याला होईना राजी ।**
**बंधूनं माझ्या जातां जातां कुठं केली ठकबाजी ? ॥**

माहेरच्या नातलगांत मामा, मावशी हेहि आवडते नातलग असतात. सासरच्या माणसांत पति हा सर्वस्व, देव या भावना असतातच; परंतु हिंदु समाजांतील पति-पत्नी-प्रेमांतील मुग्धता लक्षांत घेतां पतीबद्दलचीं गीतें थोडीं मिळावींत हें साहजिकच आहे. सासरच्या मंडळींत फक्त लहान दीर मात्र स्नेहाचें ठिकाण बनतो. अंशतः भावाची उणीव तो भरून काढतो हेंच त्याचें कारण असावें. म्हणूनच “ दीर बाई दाजीबा नटवा ” यासारख्या कौतुकानें भरलेल्या ओळी मिळतात.

कुटुंबाबाहेर मैत्रिणीबद्दलच्या भावना नेहमीं प्रेमाच्या दिसतील. परंतु शेजारणीबद्दल मात्र रोषच दिसेल. आईशीं शेजारणीची तुलना करून तिची किंमत कमी करणें हें चित्र ओंवीगीतांतून नेहमीं आढळतें.

---

(१) मूळ + हारी मुल्हारी, त्याचा अपभ्रंश मुऱ्हाळी झालेला नेहमीं दिसतो.

**शेजीपाशीं गुज बोलून गेलं वाया ।**
**नाहीं माझी बया हुरदीं[1] साटवाया ॥**

**रूढि, चालीरीति व समजुतीः—**

या लोकवाङ्मयांतून पूर्वापार समाजांत चालत आलेल्या रूढि, चालीरीति व समजुती किंवा लोकाचार यांचें दर्शन होत असतें. धर्माच्या कल्पना, मनुष्य-जीवनाचें तत्त्वज्ञान इत्यादींचे आधारें अनेक रूढि समाजांत इतक्या खोल रुजलेल्या असतात कीं सहजासहजीं त्यांना उखडून काढणें सोपें नसतें. काळाच्या उदरांत अशा कित्येक रूढींचा लोपहि होत असतो. समाज-अवस्थांनुसार नव्या चालीरीति तयार होत असतात. जुन्या राहिलेल्या अवशेषांना कांहींतरी विडंबनाचें स्वरूप प्राप्त होत असतें. पुष्कळशा रूढींचा संबंध अखेर कृषिजीवनाशीं जाऊन पोंचतो. आपल्या समाजांतील अनेक व्रतवैकल्यें पावसाळ्यांत असतात याचें कारणहि पावसाळ्याचें शेतकरी जीवनांतील महत्त्व. नागपंचमी, गणपति, गौरी, गोकुळाष्टमी हे सगळे सण श्रावण भाद्रपदांत येतात. धनधान्याची त्या वेळीं समृद्धि असते. मुलीबाळींना याच वेळांत माहेरीं आणण्याची प्रथा आहे. त्यांच्या मंगळागौरी साजऱ्या होतात.

लग्नासारख्या समारंभांतूनहि अनेक रूढींचा पगडा बसलेला असतो. भावाची मुलगी व बहिणीचा मुलगा यांचें लग्न करण्याची प्रथा अमलांत असणें हें समाजसंस्कृतीच्या एका विशिष्ट अवस्थेचें द्योतक आहे. कुटुंब संस्था व लग्नसंस्था उदयाला आल्यावर सख्ख्या किंवा चुलत भावंडांचा संबंध त्याज्य मानला जाऊं लागला. गोत्रपिंडाचीं बंधनें घातलीं गेलीं; परंतु आपल्या संकुचित समाजाच्या बाहेर मुलगी देणेंहि योग्य मानीत नसत. अशा अवस्थेंत आतेमामे भावंडें किंवा मामा-भाची हे संबंध शिष्ट मानले जाऊं लागले असावेत. त्या अवस्थेचा पगडा अद्याप कांहीं अंशांनीं समाजा-वर असावा. ओवीगीतांतून सासूला ' मालण ' हा शब्दप्रयोग सर्रास आढळतो. मालण म्हणजे ' मावळण ' म्हणजे आत्या." दादा लेकी मागण

---

(१) हृदय.

आलें " यासारखीं गीतेंहि हीच रूढि दर्शवतात. हिंदुधर्मांत लग्न हा एक संस्कार मानलेला असल्यानें त्याला धरून त्यांतील रूढि बसविलेल्या आहेत.

दैनंदिन जीवनांतील अनेक अंध समजुतींचा उल्लेख ओवी-गीतांतून किंवा इतर गाण्यांतून आढळेल. पुष्कळदां विडंबन स्वरूपांतहि या समजुती आज राहिलेल्या असतात. त्यांचा उगम शोधून काढण्याचें एक काम समाजसंशोधकांना करण्यासारखें आहे. कधीं कधीं स्वच्छता, व्यवस्थितपणा यांसाठीं निर्माण केलेलीं सोंवळया-ओंवळयासारखीं बंधनें पुढें त्यांतील सार बाजूला पडून सांगाडा—अवस्थेंत शिल्लक रहातात हें आपण पहातोंच. खालील ओंव्यांत असे कांहीं निर्देश येऊन गेले आहेत. जात्याच्या पिठाच्या राशींत बोटें घालूं नयेत, तें भावाला वाईट असतें अशी समजूत आहे:—

**जातीयाची शीग मोडूं नये ती बोटानं ।**
**तुझ्या पाठचा पठाण[१] ॥**

सोमवारीं नहाणें किंवा आपट्याच्या झाडाखालीं उभें रहाणें हें वाईट समजलें जातें:—

**भावाच्या बहिणीनं काय आंकरीत[२] केलं ।**
**सोमवारीं नहाली पाणी बेलाच्या खालीं गेलं ॥**
**भावाच्या बहिणीनं वाकडी वाट केली ।**
**आपट्याखाली गेली गळाभरून सोनं ल्याली ॥**

घरांत गर्भवती असली तर सापाला देखील मारणें बरें नाहीं, तें गर्भाला वाईट आहे असें मानतात—

**माळ्याच्या मळ्यांत सर्प लोळे सावलीला ।**
**नको मारूं दादा गर्भ तुझ्या मावलीला ।**

(१) पाठचा भाऊ. (२) वेडेंवांकडें.

दृष्ट लागण्याची कल्पना सर्वत्र प्रचलित आहे. दृष्ट काढून टाकण्याकरितां मीठ, मिरची, मोहरी किंवा कांदा अशा तीव्र वासाच्या गोष्टी ओवाळून टाकीत असतातः—

**झाली तुला दृष्ट, मीठमोहऱ्या रांधाच्या ।**
**आतां माझ्या बाळा माझ्या आखूड बांध्याच्या ।**
**माळ्याच्या मळ्यांत ईसबंधाच्या[1] आळशा ।**
**अशी झाली दृष्ट तान्ह्या बाळाच्या बाळशा ॥**

शकुन अपशकुनांच्या समजुतींहि सर्वत्र आहेत. 'सासू-सुनांच्या गाण्यां'त शावूची आई बाळंतविड्यासाठीं जी तयारी करायला जाते त्या प्रत्येक गोष्टींत तिला अपशकुन होतो. कडी तोडे मोडतात. हिरवें पातळ फाटतें, कुंकवाची पुडी सांडते इत्यादि. यांवरून आईला संशय येतो. 'श्रावणाच्या कथेंत' आईबापांना कावडींतून घेऊन जाणाऱ्या श्रावणाला असेच अपशकून होतात. मांजर आडवें जातें. जळणाच्या मोळया आडव्या जातात; सापाचें वेटोळें वाटेंत लागतें; राक्षसिणी पीठ कांडतांना दृष्टीला पडतात. खालील ओवी पहा. कुंकू म्हणजे सौभाग्यचिन्ह. सकाळीं उठतांच कुंकवाचा करंडा सांपडणें म्हणजे केवढा लाभ ! —

**सकाळीं उठूनी मला लक्षा लाभ झाला ।**
**तुळशीच्या ओट्यावरी करंडा कुंकवाचा सांपडला ॥**

वरील सर्व बारीक सारीक कौटुंबिक व सामाजिक रीतीरिवाजांचा शोध या वाङ्मयांतून लागला तर समाजइतिहासाच्या अभ्यासास खात्रीनें मदत मिळेल.

---

(१) विषबांध व जवस हीं झाडें शेताला दृष्ट लागूं नये म्हणून कुंपणाला लावतात.

"मोठ मोठ डोळ" आणि "लंब लंब वाले" यावर कितीतरी ओव्या सापडतात. सौंदर्याच्या कल्पनाहि अशा गीतांवरून समजतात. आपलें गांव किंवा त्यांतील स्थळें किंवा आपण पाहिलेलीं तीर्थक्षेत्रें, बाजार या सगळ्या विषयांवरून गीतें रचलीं जात असतात. जन्ममरणाचें तत्त्वज्ञान सांगणारीं गाणीं पण सर्व समाजांत रूढ आहेत. 'पिंजरा', 'किल्ला' अशा स्वरूपाचीं गाणीं ब्राह्मण स्त्रियांत प्रचलित आहेत. त्यांतून आत्मा हा देहाच्या पिंजऱ्यांत किंवा किल्ल्यांत कोंडला गेला आहे त्याला मुक्त करा वगैरे कल्पना असतात.

**बोली भाषेंतील शब्दसमृद्धि** :—समाज इतिहासाच्या अभ्यासास ज्याप्रमाणें लोकवाङ्मयाच्या संकलनाचा उपयोग होणार आहे त्याप्रमाणें भाषाशास्त्रास व भाषावाढीसहि त्याचा उपयोग होईल. लोकवाङ्मय हें पंडितीवाङ्मय नसलें व श्राव्य स्वरूपांत चालत आलेलें असलें, त्याची भाषा पुष्कळदां रांगडी वाटली तरी बोली भाषेंतील शब्दसमृद्धि त्यांत भरपूर मिळते. पुष्कळदां भाव व्यक्त करण्यांत या शब्दांची हातोटी चांगलीच आढळून येते. प्रवासाचें वर्णन आलें कीं, त्यांत बरोबर घेतलेले 'तहानभूक लाडू' हा शब्दप्रयोग पाहा. तहानेची व भुकेची सर्व शिदोरी असा त्याचा अर्थ आहे. सूर्यनारायणाला हात जोडणारी स्त्री ओवी गातांना आपल्या भावाला 'वाढीदिडी' आयुष्य मागते. खालील ओवींत 'उजूं उजूं' शब्दप्रयोग पाहा. 'उजूं उजूं' म्हणजे 'पुन्हां पुन्हां' 'निरखून':—

**नाक तुझ डोळं न्याहाळीतें वजवज ।**
**माझ्या चंद्रभागे डोल्यावरलीं सारज ।।**

'मोठ्यामोठ्या डोळ्यांचं बघणं टपाटपा' असतें हाहि साधाच पण भाव बरोबर व्यक्त करणारा शब्दप्रयोग पहाः—

---

(१) साधना १५, २२ व २९ जुलै १९५० च्या अंकांतून या सर्व ओव्या मीं प्रसिद्ध केल्या आहेत.

**मोठ मोठ डोळ तुझं बघणं टपाटपा ।**
**माझ्या बंधवा हरणीमागल्या काळवीटा ।।**

'बाळाई'[1] किंवा 'भारजा'[2] यांसारख्या गीतांतून त्या स्त्रियांचा साज-श्रृंगार वर्णन करीत असतांना सर्व शेलक्या वस्तूंकरितां असेच शब्दप्रयोग असतात. 'मदमा काचोळी', 'चक्राचा पाट', 'झरझरा रुमाल'. बैलाला सजवतांनाहि 'मखमलमूठ', 'रेशमी पटाडं', 'घांगऱ्या चराळ' या सर्व गोष्टी येतात. उंच पेटींत आपली कासई ठेवली आहे हें सांगतांना भावजय बाळाईला सांगते—'ठिवली साती' सलदीला' म्हणजे सातव्या पेटींत. कोंकणांत मुसळधार पावसाला 'फळी धरून पाऊस पडतो' हा शब्द-प्रयोगहि बोली भाषेंत रूढ आहे. असे कितीतरी ग्रामीण शब्द आपल्याला आपल्या 'पंडिती' भाषेंत सामावून घ्यायला हरकत नाहीं.

**लोकवाङ्मयांतील साहित्यगुणः**—लोकवाङ्मय हें लोकांच्या सामूहिक अनुभूतींतून जन्माला आलें असलें व सर्वसाधारणपणें त्यांत सूक्ष्मता व मार्मिकता कमी असली तरी कांहीं वेळां अतिशय उच्च प्रतीचें वाङ्मयीन गुण त्यांत आढळतात. विशेषतः स्त्रियांनीं निर्माण केलेलीं असंख्य ओंवीगीतें तर काव्यगुणांनीं ओतप्रोत आहेत.

**उपमा-अलंकारः**—काव्यशास्त्राची निर्मिति होण्यापूर्वीपासून हीं गीतें रचलीं गेलीं असलीं तरी त्यांत कधीं कधीं आढळणाऱ्या उपमा पाहिल्या म्हणजे काव्यशास्त्राचा अभ्यास नसलेल्या स्त्रियांची देखील कल्पनाशक्ति किती प्रभावी असते हें दिसून येईल. वाङ्मयनिर्मिति हा अभिजात गुण आहे हेंच त्यावरून सिद्ध होतें. या वाङ्मयांतील उपमा कित्येकदां अगदीं व्यावहारिक व रांगडी दिसल्या तरी अत्यंत सार्थ असतात.

आईच्या मायेची थोरवी सर्वांपेक्षां अधिक आहे हें सांगतांना एक स्त्री गातेः—

**“ चैताच्या महिन्यांत चैती पालव फुटली।**
**मावलीवांचून दुसऱ्या गोताला इतकी माया कोठली? ”**

आईच्या मायेची पाखर सगळ्या मुलांना सारखेंच प्रेम देण्याइतकी मोठी असतेः—

**“ मावलीची माया सर्व्या बाळांवरी।**
**चिमणी कोट करी जाईच्या कळ्यांवरी ॥ ”**

आई व बाप दोघांबद्दलहि प्रेमाच्या भावना असल्या तरी त्यांतील सूक्ष्म भेद खालील ओव्यांत फार सुंदर दाखवला आहे. पिता हा आधार असतो व आईच्या प्रेमांत गोडवा अधिक असतो म्हणून पित्याला वडाच्या झाडाची किंवा ‘ चंदन मौलागिरीची ’ उपमा दिलेली दिसेल तर आईला करवंदीसारख्या गोड व दुधाळ फळाची किंवा नारळाची उपमा दिलेली दिसेलः—

**“ पिता माझा वड बया माझी करवंद।**
**काशीला जाते वाट दोन्ही झाडांच्या मधून ॥ ”**
**“ चंदन मौलागिरी नांव माझ्या पित्याईचं।**
**असं गोड दुधु बया माझ्या नारळीचं ॥ ”**

वरील ओवींत आई व बाप यांची सेवा केली असतां काशीयात्रेचें पुण्य घडतें ही कल्पनासुद्धां किती कल्पकतेनें घातली आहे.

ओवीगीतांतून तर आईला नेहमीं गांधारी व गोदू या नांवानें संबोधिलेलें दिसतें. गांधारी ही शंभर पुत्रांची माता होती व गोदू-गोदावरी ही महाराष्ट्रांतली पवित्र नदी म्हणूनच या उपमा असाव्यात.

‘ गाईच्या पाळण्यांत[१] ’ गाईच्या अंगोपांगांवरून डुब्बा ज्या वेळीं गातो त्या वेळीं अशाच पवित्र वस्तूंच्या सार्थ उपमा दिलेल्या आढळतात.

शिंगांना ' महादेवाचीं लिंगें ', कानांना ' नागवेलीचें पान ', पोटाला ' कापसाची मोट ', मांड्यांना ' पालखीच्या दांड्या ' इ. सर्व उपमा किती समर्पक आहेत पहा.

सूर्य उगवतो त्या वेळचें वर्णन खालील ओव्यांतून अशाच उपमांनीं केलें आहे. त्यांतील उपमा थोड्या ओबडधोबड दिसल्या तरी साधर्म्याच्या दृष्टीनें अत्यंत समर्पक आहेतः —

**उगवला दिन जसा आगीचा भडका ।**
**सुवर्णाच्या तेजीं त्याला मोत्याच्या सडकां[1] ।।**
**उगवला दिन जशी शेंदराची पुडी ।**
**माझ्या बाळाला औक्ष मागतें वाढीदिडी[2] ॥**
**उगवला दिन गगनीं लावी ध्वजा ।**
**देव भगवान साऱ्या पृथिमीचा राजा[3] ॥**

स्त्रीच्या अंगलटीचें वर्णन करतांना खालील ओवींत दिलेली ' कवाडाच्या फळी 'ची उपमा किंवा दंडभुजांना दिलेल्या ' विहिरीच्या बाजवां 'ची उपमा या दोन्ही अगदींच राकट असल्या तरी अंगचें बळ दर्शविण्याकरितां त्या बरोबर सार्थ ठरतातः—

**माझी अंगलट जशी कवाडाची फळी ।**
**माझी बयाबाई चोळी बेतून लाव कळी ।**
**माझ्या दंडभुजा जशा हिरीच्या बाजवां[4] ।**
**बयाच्या दुधाला नाहीं लागला ताजवां[5] ॥**

---

( १ ) सूर्याचे किरण. ( २ ) दिडीनें वाढणारें म्हणजे दीडपट. ( ३ ) सूर्याचें ऊन सर्व पृथ्वीभर पडतें म्हणून. ( ४ ) विहिरीच्या बाजूला लावलेले खांब. ( ५ ) तराजू—म्हणजे आईनें दूध तोलूनमापून दिलें नाहीं तर भरपूर दिलें.

मोठ्या सुंदर डोळ्यांच्या चपल हालचालीला ढगांतल्या गिरकी मारणाऱ्या चंद्राची दिलेली उपमाहि पहा—

**मोठ मोठ डोळ बघण्याची रीत न्यारी ।**
**माझ्या बंधूराया चांद ढगांत गिरकी मारी ।**

भावाच्या तारुण्याचें वर्णन पाहाः—

**वाटेनी कोण येतो निचाळ चालणीचा ।**
**माझा बंधुराया नवा जोंधळा पलाणीचा[1] ।**
**गांवाला गेला कुण्या तिकडे माझा डोळा**
**माझा बंधुराया माझा नवतीचा पानमळा ।**

गोऱ्या स्त्रीच्या गोरेपणाला दिलेल्या साध्यासुध्या उपमाहि पहाः—

**गोरीचं गोरपण उसाच्या वाड्यावाणी ।**
**खेडच्या राहणेवाला काय बघतो वेड्यावाणी ॥**
**गोरीचं गोरपण जशी हरभऱ्याची डाळ ।**
**जीवीची मायाबहीण माझी पुतळ्याची माळ ॥**

तीन गांवांत दिलेल्या तीन बहिणींच्या व भावाबद्दलची खालील ओवी पहा—

**आम्ही तिघी बहिणी तीन गांवच्या तीन पेठा ।**
**माझा बंधुराया मला सातारा दिस मोठा ॥**

---

१ पलाण = विहिरीचें पाणी लांब पोंचविण्यासाठीं घातलेली मातीची **वरवंडी.**

खालील ओवींतील उपमासौंदर्य पहा—

**तुझ्या जीवासाठीं होईन रानांतील हरण ।**
**माझ्या बंधुराया तुझ्या भोंवतालीं चरेन ॥**

खालील दोन ओव्यांत कल्पनेचें अधिक कौशल्य दिसेल. सकाळीं स्नान करून रामाचें नांव घेत लुगडें नेसणारी स्त्री गाते—

**राम राम म्हणूं राम माझी साडी चोळी ।**
**उलटतें घडी सकाळीच्या प्रातःकाळीं ॥**

पुष्कळ मुलें व पुष्कळ भावंडें असणारी स्त्री म्हणतेः—

**पुतळ्याची माळ माझ्या लोळती पाठीं पोटीं[1] ।**
**माझ्या बंधवाला चंद्रहाराला झाली दाटी ॥**

**सूचकता**—दोन ओळींच्या छोट्या ओवींत कित्येकदां पुष्कळसा अर्थ ठासून भरलेला असतो. सर्वसामान्य अशिक्षित माणसाची झेप सर्व उघडें करून सांगण्यांत असते तरी सूचकतेचा अवलंब करून खालील ओव्यांतला अर्थ लपवलेला दिसेल—

**गुज बोलायला मायलेकीचं गुज गोड ।**
**मावळाया गेली चांदणी सोप्या आड ॥**

म्हणजे रात्रीं सर्व आटोपून निवांतपणें मायलेकी बोलत बसल्या तें पहाटें चांदण्या मावळल्या तरी त्यांना समजलें नाहीं.

**धनसंपत्तीला कुणी पुसना मालाला ।**
**किती महिने झाले तुझ्या कडच्या लालाला ?**

---

१ पाठींपोटीं पुतळ्या म्हणजे पोटचीं लेकरें व पाठचीं भावंडें भरपूर.

या ओवींत मुलांची किंमत ही कोणत्याहि संपत्तीपेक्षां अधिक आहे हें सांगितलें आहे.

**वर्णनशैली**—वर्णनशैलीचीहि कधीं कधीं चांगली हातोटी दिसते. बाळाईचा किंवा भारजाचा साजश्रृंगार, प्रवासाकरितां तयार केलेल्या नंदीचें वर्णन; 'उरफाटी चोळी' 'बाणांचा भाता' 'तीरकमठा' 'गालीं चुन्याची टिकली' इ. शब्दांनीं केलेलें भिल्लिणीच्या वेषांतील गिरजेचें वर्णन किंवा बैराग्याच्या वेषांत आलेल्या रावणाचें वर्णन हीं स्त्रियांनीं जीवनांत पाहिलेल्या वस्तुस्थितीला धरून केलेलीं दिसतात. चंद्रावळीच्या गीतांतील कृष्णाचें 'चित्राव काठी', 'बेगडी वहाणा' इ. शब्दांनीं रंगविणारें चित्रहि डोळयांसमोर उभें राहील. नदींत उडी टाकण्यास भारजेनें केलेली स्वतःची तयारीहि अशीच आहे. 'घातली आपली कास दंडी पदर सावरीला, बांधली केसाची जुडी' इ. पांच गौळणींचें गाणें तर त्या त्या रंगाच्या वर्णनाकरितां शेलक्या गोष्टींचा उपयोग करून रचलेलें आहे.

**रसाविष्कार**—उपमा अलंकारांप्रमाणेंच या गीतांतून कित्येकदां रसाविष्कारहि चांगला साधलेला असतो. तान्हुल्यावरून ओव्या गातांना निर्माण झालेला वात्सल्य रस आपण अनेकदां अनुभवलेला असतोच. लावण्या, वग किंवा गौळणी इ. शाहिरी वाङ्मयांतून विलसणारा वीर व श्रृंगार रस हाहि त्या त्या गीतांतून आढळून येईल. 'भारजा' किंवा 'जैता' यांच्या कथांतून किंवा श्रावणाच्या कथेंतून आविष्कृत झालेला करुण रस आपल्या भावना हलविल्याशिवाय रहात नाहीं.

**लोकवाङ्मयाच्या तंत्राचें स्वरूप**:—लोकवाङ्मयाची निर्मिती कुठलेंहि काव्यशास्त्र किंवा छंदःशास्त्र तयार केलें जाण्याच्या पूर्वींच झाली असली पाहिजे हें आपण पाहिलेंच. पण रूढ छंद किंवा वृत्तें हीं त्याला लागू नसलीं तरी कांहीं तरी काव्याचें तंत्र आपापल्यापरी या लोकांनीं पाळलेलें दिसेलच. गेयता येण्यापुरतें यमक, प्रास इ. गोष्टींचें बंधन तर त्यांत असतेंच. सर्वांत जुना अनुष्टुभ् छंद कदाचित् अशा पूर्वी चालत आलेल्या प्रकारांतून निर्माण झाला असण्याचाहि संभव आहे. झोपाळयावरची ओवी ही

साडेतीन चरणांचीच असते व त्यांतील शेवटचा अर्धा चरण ज्याच्या-वरून गीत गायचें त्याच्या नांवावरून तयार केलेला असतो. जात्यावरची श्रमिक स्त्रियांत प्रचलित असलेली ओवी मात्र चार चरणी असते. कथा-गीतें मात्र अधिक गद्यात्मक असतात.

( ३ ) **बालमनाशीं साधर्म्य**—या वाङ्मयाचा आणखी एक गौण उपयोग म्हणजे बालमनोरंजनार्थ व बाल–शिक्षणाचे दृष्टीनेंहि हीं गीतें व कथा आकर्षक ठरतात. श्री. शं. ग. दाते यांनीं संग्रहित केलेल्या "लोक–कथा" मधील उंदराच्या किंवा कावळ्याच्या गोष्टी मुलांना अद्यापहि ऐकाव्याशा वाटतात, आणि याचें एकच कारण म्हणजे अप्रगल्भ अशा बाल-मनाचा व्यापार आणि अशिक्षित जनमनाचा मनोव्यापार यांत कांहीं बाब-तींत साधर्म्य असतें. पुनरावृत्ति किंवा "तोच तो पणा" हा बालवाङ्मयां-तून आढळतो. इंग्रजींतील तीन अस्वलांची गोष्ट सांगतांना बाबा-अस्वलानें अमुक केलें मग आई-अस्वलानें तेंच केलें व मग बाळ-अस्वलानें तेंच केलें हें सांगत बसतांना आपल्याला कंटाळा आला तरी मुलें किती मनःपूर्वक ऐकत असतात हें आपण पहातों. "बाळाई"च्या किंवा "भारजा"च्या कथें-तील "एक वन ओलांडिलं", "दोन वनं ओलांडिलीं" पासून "पांच वनें ओलांडण्या"पर्यंत तोच चरण स्त्रिया गातात तेव्हां आपल्याला तें चऱ्हाट वाटलें तरी त्या स्त्रिया त्या गाण्यांत तन्मय होऊन गात असतात. दुसरें म्हणजे अतिरंजित किंवा अमानुष अशा वर्णनामध्यें लहान मुलांच्या भाबड्या मनाला एक विलक्षण कुतूहल वाटत असतें, तसेंच अशिक्षित मनालाहि वाटतें असें आपल्याला आढळेल. लहान मुलांच्या "सोनसा-खळी"च्या गोष्टींत ज्याप्रमाणें मृत माणसांचें झाड उगवतें व तें बोलूं लागतें, त्याचप्रमाणें "बाळाई"च्या गोष्टींतहि आपल्याला आढळतें.

## लोकवाङ्मयाचे प्रकार

लोकवाङ्मयाचे प्रामुख्यानें गद्य वाङ्मय व पद्य वाङ्मय हे दोन प्रकार दिसतात. गद्यङ्मयांत आजीबाईच्या गोष्टी, प्राण्यांच्या गोष्टी, भुतांच्या गोष्टी, राक्षसांच्या गोष्टी इत्यादि लोककथा व उखाणे, म्हणी, कोडीं, संवाद

हे प्रकार येतात. गद्य वाङ्मयाचें संकलन आजपर्यंत फार थोडें झालेलें दिसतें. कारण गद्य वाङ्मय लौकर विसरलें जातें. पद्य वाङ्मयांत ओवीगीतें, फेरावरचीं गीतें, लग्नसमारंभांतील गीतें, न्हाणुलीचीं गीतें, डोहाळे व पाळणे, देवींची गाणीं, देहावरचीं तत्त्वज्ञानात्मक गीतें इत्यादि स्त्रियांचीं गाणीं व लावण्या, वग, गवळणी वगैरे पुरुषांचीं गीतें येतात. गेय वाङ्मय हें स्मरणांत ठेवणें अधिक सोपें असतें व मनोरंजनहि त्यांतून जास्त होतें. म्हणूनच पद्य वाङ्मय अद्याप पुष्कळसें उपलब्ध आहे.

पुरुष-निर्मित व स्त्री-निर्मित असेहि या वाङ्मयाचे दोन प्रकार पडतात. वाङ्मयामागील हेतु समजून घेतले म्हणजे भाषाशास्त्राचा व थोडयाफार संस्कृतीचा उदय झाल्यानंतर स्त्रियांना जशी वाङ्मय-निर्मितीची आवश्यकता भासली तशी पुरुषांनाहि भासली असलीच पाहिजे, व स्त्रियांच्या बुद्धीनें जसें यांत काम केलें तसें पुरुषांच्याहि बुद्धीनें केलें असलें पाहिजे. परंतु सुधारणा व शिक्षण यांचा प्रसार प्रथम पुरुषवर्गांत झाल्यानें पुरुष लौकरच पंडिती वाङ्मयाकडे वळले. स्त्रिया मात्र अतांपावेतों आशिक्षित राहिल्यानें त्यांचेकडून लोकवाङ्मयाच्या निर्मितीचें काम दीर्घकाल चालू राहिलें. पण त्यामुळें लोकवाङ्मय हें स्त्रियांचेंच वाङ्मय आहे असाहि एक चुकीचा समज निर्माण झाला. साने गुरुजींनीं आपल्या संकलनाला दिलेलें "स्त्री-जविन" हें नांव व डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं आपल्या टीकात्मक पुस्तिकेला दिलेलें "अपौरुषेय वाङ्मय" हें नांव यामुळें हा गैरसमज वाढण्यास आणखी मदत झाली. फार पुरातन कालाचें वाङ्मय आपण गमावलें व गेल्या कांहीं शतकांतीलच वाङ्मय आज आपल्याला उपलब्ध आहे, त्यामुळें स्त्रियांच्या वाङ्मयाचेंच आज अधिक संकलन होणें शक्य आहे. तरीहि अगदीं मागासलेल्या आदिवासी समाजांतून पुरुषवर्गाचेंहि वाङ्मय अद्याप मिळूं शकेल.

## ओवी गीतें

लोकवाङ्मयांत 'ओवी गीतें' हा पद्य प्रकार सर्वांत अधिक लोकप्रिय झाला आहे हें आपण पाहातों. सर्वसाधारण' अशिक्षित जनतेच्या

मनांतील विचारांना वा भावनांना वाङ्मयांत आविष्कार मिळावयाचा तर अत्यंत सुलभ व लवचिक अशा पद्यरचनेची आवश्यकता असते व तशा तऱ्हेची सुलभ रचना 'ओवी' या प्रकारांत असल्यामुळें मुख्यत्त्वेंकरून स्त्रियांनीं आपल्या भावनांना वाट देण्यास व आपलीं जीवनचित्रें रंगविण्यास ओवीचा अवलंब केला असावा. ओवी या श्राव्य पद्याचा उगम अतिशय प्राचीन म्हणजे ११ व्या शतकाच्या पूर्वीचा असावा असा उल्लेख श्री. भावे यांनीं केला आहे[1]. आणि त्या वेळीं महाराष्ट्रांत श्राव्य ओवीची असलेली ही सामुदायिक लोकप्रियता व सर्वसामान्य जनतेंत खोलवर जाऊन पोंचलेलीं तिचीं मुळें लक्षांत घेऊनच मराठी वाङ्मयाच्या प्रारंभकाळीं महानुभावी पंथीय कवींनीं व त्यानंतर ज्ञानेश्वर आणि इतर संतकवी यांनीं आपल्या भागवत धर्माची शिकवण समाजाच्या कानाकोपऱ्यांत, अगदीं सामान्य व अशिक्षित जनतेंत खोलपर्यंत नेऊन पोंचवण्याकरितां आपल्या प्रचारकार्याला ओवी या सुलभ व लोकप्रिय पद्यरचनेची मदत घेतली असावी.

पांढरपेशा वर्गांत झोपाळ्यावर बसून किंवा मुलाला अंगाई गातांना म्हटल्या जाणाऱ्या ओव्या साडेतीन चरणी असतात व त्यांना ठराविक चाली लावलेल्या असतात; परंतु श्रमिक स्त्रिया जात्यावर दळतांना ज्या ओव्या म्हणतात त्या बहुधा चार चरणी असतात व त्या स्त्रिया त्यांना निरनिराळ्या चाली लावून व दोनच ओळी अत्यंत कुशलतेनें आळवून आळवून म्हणतात.

ओवीगीतांचा संग्रह आतांपर्यंत भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका या व इतर नियतकालिकांतून बराचसा येऊन गेला आहे. कै. साने गुरुजींचें 'स्त्री-जीवन' हा प्रामुख्यानें ब्राह्मण वर्गांतील स्त्रियांच्या ओव्यांचा संग्रह आहे. सौ. मालतीबाई दांडेकरांचें 'लोकसाहित्याचें लेणें' हा मराठमोळ्या स्त्रियांच्या ओवीगीतांचा संग्रह आहे. माझ्या संग्रहांतहि ओवीगीतांचा संग्रह बराच आहे. परंतु १९४१-१९४२ सालच्या साहित्य पत्रिकेच्या अंकांतून तो सर्व संग्रह अगोदरच

---

१. श्री. वि. ल. भावे : "महाराष्ट्र सारस्वत" भाग १ पृ. ७

प्रसिद्ध झालेला असल्यानें व या पुस्तिकेच्या मर्यादा लक्षांत घेऊन या-ठिकाणीं तो पुन्हां दिलेला नाहीं, तरीहि ओवी हा लोकवाङ्मयाचा सर्वांत प्रमुख व सर्वांत लोकप्रिय प्रकार आहे. कल्पनाचातुर्य व उपमा अलंकार इत्यादि काव्यगुण ओवींतच सर्वांत अधिक प्रमाणांत आढळत असल्यानें प्रस्तावनेंत थोड्या विस्तारानें यावर लिहिण्याचा प्रयत्न मी करीत आहें. विविध प्रकारचीं लोकगीतें दिलेल्या माझ्या या संग्रहाला त्यामुळें पूर्णता येईल असें वाटतें.

ओवीगीतांच्या विषयांत विविधता ही फार मोठी आहे. जात्यावर बसलेल्या स्त्रीच्या आवतींभोंवतींच्या गोष्टी, तिच्या डोक्यांत येणाऱ्या सर्व कल्पना, तिनें ऐकलेल्या पौराणिक किंवा इतर कथा, तिचे कुटुंबांतील निर-निराळे नातलग, किंवा शेजारपाजारचे लोक, तिच्या भावाचें शेत, स्त्री-पुरुष पेहरीत असलेले कपडे किंवा दागिने, तिचें घर किंवा तिनें पाहिलेलें एकादें तीर्थक्षेत्र, घरांतील तिचा दिनक्रम किंवा शेतावरील तिच्या भावाचा दिनक्रम, तिच्या गोठ्यांतील गुरें या सर्व गोष्टींवरून ओव्या रचल्या जात असतात. अत्यंत सुटसुटीत साडेतीन किंवा चार चरणी लहान गीतांतून भरलेला मोठा अर्थ व दिसून येणारे साहित्यगुण या दृष्टींनीं ओवीगीतांचें वैशिष्ठ्य मोलाचें आहे.

**लोकवाङ्मयांतील पुराण कथा भाग :**—श्राव्य स्वरूपांत चालत आलेलें पुराणवाङ्मय हेंहि अनेक अवस्थांतून व स्थित्यंतरांतून गेलेलें आपल्याला आढळतें. लोकवाङ्मयांत आधाराला घेतलेल्या पौराणिक कथा या मूळ रामायण किंवा महाभारतापासून पुष्कळच दूर गेलेल्या दिसतील. उदाहरणार्थ सीतेचा शेवट धरणीमाता दुभंगून तिला पोटांत घेते असा मूळ रामायणांत आहे; परंतु लोकवाङ्मयांत सीतेचा त्याग करण्यास तयार झालेला राम लक्ष्मणाला तिचा वध करायला सांगतो व लक्ष्मण सीतेचा वध करून तिचा हात किंवा इतर पुरावे आणतो असा शेवट आढळेल[1].

---

(१) अंकुशपुराण हें कोंकणांतील स्त्रीनें दिलेलें गीत म० सा० पत्रिका वर्ष १४ अंक ४ मध्यें दिलें आहे तें पहा.

सीतेला वधिली साक्ष आणिला तिचा हात ।
केगई सासू जेविली दूधभात ॥

सीतेला वाधिली साक्ष आणिल तिच डोळ ।
राम धरणीला लोळ ॥

पौराणिक व संतवाङ्मयावर लोकवाङ्मय रचलें जातें तेव्हां आणखी एक गोष्ट लक्षांत येते ती म्हणजे ऐतिहासिक सत्यतेपेक्षां देवादिकांना व पुराण-व्यक्तींना मानवी पातळीवर आणावयाचें, संसारी कोंदणांत त्यांना बसवावयाचें व मग त्यांचीं काल्पनिक कौटुंबिक किंवा भावनात्मक चित्रें रंगवायचीं. लोक-वाङ्मयांत चित्रित झालेल्या रामायणकथांतून रामाच्या स्वभावपरिपोषास विशेष वाव दिलेला नाहीं उलट गाणाऱ्या स्त्रियांची सर्व सहानुभूति सीतेकडे वळलेली दिसते. सीतेवर झालेला अन्याय या स्त्रियांची मानवतेची कळकळ जागृत करतो. म्हणूनच सीतेचा नंतरचा वनवास अतिशय हृदयस्पर्शी शब्दांनीं वर्णन केलेला आहे.—

सीता चालली वनवासा कुकू कपाळ भरूनी ।
तिचा अळींकार राम हेरीतो दूरूनी ॥
सीतेला घालवाया आयाबायांचा घोळका ।
संभाळा बायांनो राम भुकेचा आळका ॥
लक्षूमण दीरा सांग मनींचं कपट ।
नव्हं माहेराची वाट रान दिसतं अचाट ।
भयाण वनामधीं सीता रडते आईका ॥
तिला समजावया बोरीबाभळी बाईका ॥
सीता वनवासी दगडाची केली उशी ।
येवढ्या वनामधीं बाई झोप आली कशी ?
सीता नार बांळतीण तिला सुईण नाहीं कोणी ।
नेत्र झाकुयानी तातोबा घाली पाणी ॥

तुळशीच्या कथेवर आधारलेल्या गीतांतून तर मानवी पातळींत या गोष्टी आणल्यानें अतिशय मनोरंजकता निर्माण झाली आहे. तुळस ही श्रीकृष्णाची अधिक लाडकी झाल्यानें रुक्मिणी व राधा यांचा मत्सर कसा जागृत होतो तें ओवीगीतांतून चित्रित केलें आहे--

**राई रुकमीण दोघी भांडती परसदारीं ।**
**विठ्ठलदेवाची तुळशी धाकलीनें पिर्ते नेली सारी ।**
**रुकमीण बोल "माझ्या विठ्ठला पिर्तीच्या ।**
**वाऱ्याला नका जाऊं तुळशी गरतीच्या" ॥**
**रुकमीण बोल "देवा पिरतीची कोण ?"**
**"काय सांगूं रुकमीणी माझ्या तुळशीचं गुण ?"**
**रुकमीण बोल "जळो तुळशीचं जिणं ।**
**वर्षाच्या वर्षी लावी देवाशीं लगीन" ॥**

संतवाङ्मयांतील भक्तिपंथाचा प्रभाव होऊन पंढरपूर व इतर तीर्थक्षेत्रां-वरहि अनेक गीतें रचलेलीं आढळतात. त्यांतहि देवादिकांना मानवी पातळींत आणून बसविलेलें आढळेल.

**सकाळीच्या पारीं रुकमीण घालती रांगुळ ।**
**देव करीतो अंघोळ ॥**
**पंढरीच्या माळावरी उडती पिवळी माती ॥**
**रुकमीण सारवी रंगमहालाच्या आठ भिती ॥**
**पंढरीच्या वाट सांडला चुनाकात ।**
**विठ्ठल रुकमीण गेलीं जोड्यानीं पान खात ॥**
**पंढरीची वाट कशानं झाली वली ?**
**रुकमीण न्हाली केस वाळवीत गेली ॥**

सर्व पुराणवाङ्मयांत रामायणाची कथा, श्रीकृष्णाच्या लीला, शंकर पार्वतीचा रुसवा हे विषय सामान्य मानवतेला धरून असल्यानें लोक-

वाङ्मयांत तेच लोकप्रिय झालेले दिसतात. कृष्ण व राई यांचे खेळ किंवा चंद्रावळीचीं गाणीं हीं शृंगारिक व आकर्षक झालेलीं आहेत. ती प्रस्तुत संग्रहांत आलींच आहेत.

**लोकवाङ्मयांत दिसून येणारी अश्लीलता:**—लोकवाङ्मयाचा संग्रह जर आपल्याला मोकळेपणानें लोकांत प्रवेश करून मिळवितां आला तर कित्येक अश्लील गीतांचा ठेवा अशिक्षित समाजांत असलेला आपल्याला आढळून येईल. आज प्रसिद्ध करण्यास आपल्याला संकोच वाटेल इतकी अश्लीलता कांहीं गीतांतून असते पण समाजशास्त्राच्या व इतिहासाच्या अभ्यासास निघालेल्या अभ्यासकाला या जुन्या वाङ्मयांतील चांगला भागच दाखवायचा व वाईट भाग सोडून द्यायचा हें देखील योग्य होणार नाहीं म्हणूनच या संग्रहांत अश्लील गीतांचे नमुने मी ठेवले आहेत. लग्नांतील रुखवताचे उखाणे व गाणीं हीं अश्लीलतेनें ओतप्रोत असतात. कुठलाहि संकोच व भीडभाड न ठेवतां मनांतील घाणेरड्या कल्पना देखील मोकळेपणानें व्यक्त करावयाच्या हें या संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे.

## लोकवाङ्मयाचा अभ्यास

लोकवाङ्मयाची निर्मिति पुरातन कालापासून झाली असली तरी त्याचें महत्त्व लोकांना अलिकडील काळांतच समजूं लागलें. पाश्चात्य देशांतून याचा अभ्यास प्रथम सुरूं झाला. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी या देशांत लोकवाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्या संस्था ( Folklore Societies ) स्थापन होऊं लागल्या. आपल्याकडेहि लोकवाङ्मयाचें संकलन करण्याचें काम प्रथम पाश्चात्य मिशनरी लोकांनींच केलें. महाराष्ट्रांत मेरी फ्रिअर या बाईनें या कामाची मुहूर्तमेढ रोवली. जेम्स कँबेल, एन्थोव्हेन यांनीं मुंबई गॅझेटमध्यें प्रश्नपत्रिका देऊन लोकरूढि लोकवाङ्मय याबाबत माहिती गोळा केली. मात्र या वाङ्मयावर स्वतंत्र रितीनें चर्चा महाराष्ट्रांतील विद्वानांनीं मागील पिढींतच केली. श्री. राजारामशास्त्री भागवत यांनीं ' विविधज्ञान विस्तारां'त लिहिलेला गोंडी गीतांच्या विवेचनाचा लेख, श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं

'निबंध मालें'त केलेले लोकगीतांचे उल्लेख, श्री.कुंटे यांनीं पुणें विभागाची माहिती देतांना गॅझेटमध्यें दिलेले उखाण्यांचे नमुने किंवा लेले शास्त्री यांनीं 'धर्म' मासिकांत स्त्रियांच्या गीतांच्या विपुल सांठ्याचा केलेला निर्देश, श्री. वा. गो. आपटे यांचा 'अद्‌भुतकथा' हा लेख इत्यादींवरून महाराष्ट्रांतील विद्वानांचें लक्ष या विषयाकडे खेंचलें होतें हें सहज लक्षांत येईल. या विषयाचा सखोल अभ्यास करण्याकरितां लागणारा संग्रह मात्र त्या वेळीं त्यांचेसमोर नव्हता. इतिहास संशोधक मंडळानेंहि गेल्या पंचवीस वर्षांत या विषयावर बरेंच संकलन प्रसिद्ध केलें. महाराष्ट्र साहित्य परिषदेनेंहि याबाबत कामगिरी बजाविली आहे. डॉ.इरावती कर्वे, डॉ. कमलाबाई देशपांडे, डॉ. सरोजिनी बाबर, श्री. मालतीबाई दांडेकर या स्त्रियांनीं संकलन व टीकात्मक लेख या दृष्टीनें गेल्या कांहीं वर्षांत अनेक मासिकांतून लिखाण केलें. कै. साने गुरुजींनीं संग्रहित केलेला "स्त्री-जीवन" हा संग्रह पुस्तकरूपानें झालेला प्रथम संग्रह आहे. गुरुजींनीं त्यावर साहित्यात्मक विवेचनहि पुष्कळसें केलें. श्री महादेवशास्त्री जोशी यांनीं संग्रहित केलेले पुष्कळ कथा, कहाण्या विषयक लेख अलीकडे प्रसिद्ध होत असतात. 'साधना' साप्ताहिक, 'मौज' 'सत्यकथा', 'स्त्री', इत्यादि नियतकालिकांतूनहि हें वाङ्मय वारंवार प्रसिद्ध होत असतें. या विषयावर आज सर्वांत महत्त्वाची कामगिरी श्री. दुर्गा भागवत या करीत आहेत. त्यांनीं सातपुड्यांतील गोंडी लोकांची व महाराष्ट्रांतील लोकांचीं पुष्कळशीं गीतें प्रसिद्ध केलीं आहेतच, पण त्याबरोबरच जगांतील व हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांतील लोकवाङ्मयाच्या झालेल्या अभ्यासावरून सर्वांचा तौलनिक असा आढावा घेण्याचाहि त्या प्रयत्न करीत आहेत. १९५० च्या 'साहित्य'च्या मे अंकांत श्री. दुर्गा भागवत यांनीं 'आमचें लोक-साहित्य' हा शास्त्रीय विवेचन करणारा व तोंपर्यंतच्या सर्व संकलनांची सूचि देणारा लेख प्रसिद्ध केला होता. त्यानंतर पुढील दोन वर्षांत जीं संकलनें निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध झालीं त्यांचा परामर्श डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं 'साहित्य लेण्याच्या निमित्तानें' या सह्याद्रीच्या फेब्रुवारी १९५३ च्या अंकांतील आपल्या लेखांत घेतला आहे. या दोन्ही लेखांनीं अभ्यासकांचें काम सोपें केलें आहे. माझ्या संग्र-

ह्याच्या शेंवटीं आत्तांपर्यंतच्या लेखांची यादी मिळेल तितकी देण्याचा प्रयत्न मी केला आहे

लोकवाङ्मयाला "लोक—वाङ्मय" म्हणावें कीं "लोक—साहित्य" म्हणावें कीं " लोकविद्या " अशीहि एक चर्चा विद्वानांच्या लेखांमधून आपल्याला आढळून येईल. श्राव्य किंवा बोली स्वरूपांत चालत आलेले वाणीचें म्हणून "लोक—वाङ्मय" हें नांव सार्थ आहेच. परंतु लोक—वाङ्मय ही संज्ञा विषयाची व्याप्ति मर्यादित करते असें श्री. दुर्गा भागवत यांचें म्हणणें आहे. "लोकसाहित्य" या शब्दांत लोकवाङ्मयाप्रमाणेंच लोकरूढि, लोकाचार इत्यादींचाहि अंतरभाव होतो. " लोक—विद्या " हेंहि असेंच व्यापक व इंग्रजी Folk-lore शब्दांचें भाषांतर आहे. माझ्या संकलनांत गीतेंच फक्त असल्यानें मीं त्याला " लोक—गीतें " ही मर्यादित संज्ञाच पसंत केलेली आहे.

## प्रस्तुत संग्रहाच्या मर्यादा

माझ्या या पुस्तकांत विषयाच्या तात्त्विक विवेचनाच्या मागें फारसें न लागतां माझें जमा केलेलें संकलन योग्य मांडणी व वर्गीकरणासहित लोकांसमोर ठेवावें हाच मुख्य हेतु आहे. हीं लोकगीतें मीं मुंबईतील मजूर वर्गांत हिंडतांना गोळा केलेलीं आहेत. मुंबईतून तीं गोळा केलीं असलीं तरी मुंबईंत येऊन राहिलेले मजूर हे महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतून आलेले असल्यानें व त्यांची संस्कृति त्या त्या भागांतीलच असल्यानें महाराष्ट्रांतील प्रातिनिधिक स्वरूप या संग्रहाला प्राप्त झालेलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. अर्थात त्यांतून प्राधान्येंकरून मागासलेल्या जमातींतील स्त्रियांचींच गीतें मी घेतलीं आहेत. क्वचित् ब्राह्मण स्त्रियांकडून जमविलेलीं गीतेंहि मीं तुलनात्मक अभ्यासाचे दृष्टीनें घेतलीं आहेत. यांतही वर्गीकरणानंतर मला असें दिसून आलें कीं, कोंकणांतील गीतें मला फारच थोडीं मिळालीं आहेत. देशावरचीं म्हणजे पुणें, सातारा, नगर व सोलापूर या जिल्ह्यांतीलच गीतें बरींचशीं आहेत. कांहीं गीतें मीं लोणी-काळभोर या पुणें जिल्ह्यांतील गांवामधून मिळावेलीं आहेत तर कांहीं पुणें शहरांतून

व कांहीं कुलाबा जिल्ह्यांतील एक दोन ब्राह्मण स्त्रियांकडूनहि मिळविलीं आहेत. माझ्या संकलनांतील वाङ्मय हें फक्त पद्यवाङ्मयच आहे. व तेंहि बरेंचसें स्त्रीवर्गाकडूनच मिळविलेलें आहे. पुरुषांच्या गीतांचा एक छोटा संग्रह " महारी वग " या माझ्या १९५२ च्या सत्यकथा दिवाळी अंकांतील लेखांत मीं दिला आहे. माझ्या संग्रहांतील ओवीगीतांचें संकलन " महाराष्ट्र साहित्य पत्रिका " व " साधना " यांतून लेखांचें रूपानें प्रसिद्ध झालेलें आहे. महाराष्ट्रांतील घाटावरच्या भागांतून व प्रामुख्यानें श्रमिक वर्गांतून हें वाङ्मय मिळालें असल्यानें व तेंहि सर्व गद्यवाङ्मय असल्यानें माझ्या पुस्तकाला मी " घाटावरील श्रमिकांचीं लोकगीतें " हें नाव दिलें आहे.

स्त्रियांचें अगर पुरुषांचें तोंडून जसें मिळालें तसेंच हें वाङ्मय मीं उद्धृत केलेलें आहे. महार, चांभार अगर मराठा समाजांतील स्त्रियांकडून तें मिळालें असल्यानें तें अस्सल आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सामान्यपणें गेल्या ३–४ शतकांतील हें वाङ्मय असावें असें वाटतें. आगगाडी मोटार यांचे कालापर्यंत तें येऊन ठेपलेलें आहे.

विविधता हें या संग्रहाचें एक वैशिष्ट्य आहे. आतापर्यंत निरनिराळ्या नियतकालिकांतून ओवीगीतांचें संकलन बरेंचसें प्रसिद्ध झालें आहे. माझ्या या पुस्तिकेंत ओवीगीतें सोडून नागपंचमीच्या फेरावरील कथात्मक गीतें, खेळाचीं गीतें, शिमग्याचीं गाणीं, लग्नाचीं गाणीं, डोहाळे, पाळणे, बायांचीं गाणीं हीं फारशीं प्रसिद्ध न झालेलीं गीतें मीं दिलीं आहेत.

# नागपंचमीच्या फेरावर

लोकवाङ्मयांत स्त्रियांनीं निर्माण केलेलें वाङ्मय अपार आहे. त्यांत ओवीगीतांप्रमाणेंच व्रतवैकल्यांशीं संलग्न असलेल्या कहाण्या, कथा-गीतें, उखाणे किंवा मनोरंजनार्थ खेळतांना गाइलेलीं गाणीं यांचा सांठाहि विपुल सांपडतो. नागपंचमीच्या दिवशीं स्त्रिया व मुलीबाळी एकत्र जमतात व मातीच्या केलेल्या नागाची किंवा वारुळाची पूजा करतात. व मग त्याचेभोंवतीं फेर धरून गाणीं गातात. ही प्रथा महाराष्ट्रांतील खेड्यापाड्यांतून किंवा शहरांतील खेडूत वस्तींतून सर्रास दिसून येते. भारतांतील जीवन हें प्रामुख्यानें शेतकरी-जीवन असल्यानें लोकवाङ्मयाचा मूळ पायाहि शेतकरी जीवनांतच आढळून येतो. धरती ही शेतकरी जीवनाचें सर्वस्व म्हणून ती मातेसमान पवित्र ठरली. गाई बैल हीं शतकऱ्याच्या उपजीविकेला आवश्यक म्हणून त्यांचेंहि गुणगान वाङ्मयांतून होऊं लागलें. पावसाळा हा तर भारतीय शेतकऱ्याच्या शेतीला फारच महत्त्वाचा म्हणून अनेक व्रतें या पावसाळ्याशींच संबंधित अशीं झालीं.

नागपंचमीच्या सणाचें एवढें महत्त्व कां तेंहि यांतच समजून येईल. पवित्र धरतींत वस्ति करून राहणारा नाग हा इतर सर्व प्राण्यांपेक्षां महाभयंकर प्राणी. त्याला दुखावलें तर तो आपला संपूर्ण नायनाट करूं शकतो म्हणून त्याला दुखवायचें नाहीं ही कल्पना सर्वत्र दिसून येईल. पावसाळ्यांत तो आपल्या आश्रयाला येतो तेव्हां एक दिवस अगत्यानें त्याला पाहुणा म्हणून बोलवायचें व त्याची पूजा करायची, अशा भावनेंतून नागपंचमीच्या सणाचा व कहाणीचा जन्म झाला असावा. नागोबा आपल्या बहिणीकडे जातात, बहिणीच्या हातून त्यांच्या शेपटीवर विळा पडतो व शेपटी तुटते असें नागपंचमीच्या कहाणींत सांगितलें आहे. म्हणून नागपंचमीच्या दिवशीं नागाला आपला भाऊ समजून स्त्रियांनीं त्याला पुजावें, लोखंडाची विळी वापरूं नये, दगडाचा पाटा वापरूं नये, नांगराच्या फाळानें तो मारला जातो म्हणून नांगर वापरूं नये, फाळासारखी दिसणारी फणी देखील वापरूं नये इत्यादि समजुती निघाल्या. पांढरपेशा वर्गांतून नागाची

पूजा करतात पण मराठा, कुणबी, महार, वगैरे म्हणजे प्रामुख्यानें शेतकरी वर्गांतील स्त्रियांमध्यें या सणाचें महत्त्व विशेषच मानतात. नागपंचमी श्रावणांत म्हणजे पावसाळ्यांतच येते. त्या दिवशीं नागाची पूजा करतात, पुरणाचें जेवण करतात व नागाभोंवतीं फेर धरून मराठमोळ्या स्त्रिया गाणीं गातात, आनंदोत्सव साजरा करतात. नागपंचमीच्या सणाचा संदर्भ नागवंशाच्या लोकांच्या हिंदुस्थानांतील वास्तव्याशींहि दुरून पोंचत असावा अशी शक्यता आहे.

या फेर धरण्याच्या पद्धतींत नृत्याचें कौशल्य विशेष कांहींच नसतें. खालीं वाकून व टाळ्या वाजवून किंवा नुसतेच हात धरून स्त्रिया फेर धरतात. गाण्यांतहि काव्याचे गुण कांहींच नसतात. गाणीं बहुधा गद्यात्मक असतात व त्यांच्या चालींतहि विशेष कांहींच आकर्षकता किंवा वैचित्र्य नसतें. सर्व गाणें एकाच सुरांत असतें व प्रत्येक चरण दोनदां म्हटला जातो. या गाण्यांचे विषय मात्र अमुकच मर्यादित असतात असें म्हणतां येणार नाहीं. गोपजीवनांतून निर्माण झालेलें "बहुळा" गाइचें किंवा हरणाचें गुणगौरवात्मक गीत त्यांत असतें, "बाळाई", "भारजा", "जैता" यांसारखीं लांबलचक सामाजिक किंवा कौटुंबिक स्वरूपाचीं कथागीतें त्यांत असतात, शिवपार्वती किंवा कृष्णाच्या गाण्यासारखीं पौराणिक विषयांवरील गीतें त्यांत येतात, माहेराचें कौतुकानें गुणगान करणें व सासरला नांवें ठेवणें अशासारखे पूर्वीच्या स्त्रियांचे आवडते विषयहि त्यांत येतात किंवा दागिन्यांवरून गाइलेलीं खेळकर स्वरूपाचीं गाणींही त्यांत असतात.

शेतीच्या जीवनांत गाई-बैलांचें महत्त्व फार. गाय ही हिंदु लोकांनीं पवित्र दैवतच मानलेलें आहे. त्याच पवित्र भावनांनीं गुराखी लोकांनीं "(बहुळा) गाईचें गाणें" गाइलेलें आहे. भवळा (बहुळा) गाईला खायला

( १ ) बोहळण गायीचें गाणें "दिवाळीचें गाणें" म्हणून श्री. वि. म. घुले यांनीं म. सा. प. च्या मार्च १९३१ च्या अंकांत दिलें आहे. त्यांत फक्त गाईचा वर्णनात्मक भागच आहे. हें गाणें नगर भागांत दिपवाळींत गाई बैलांना ओवाळतांना गुराखी म्हणतात असा उल्लेख त्यांनीं केला आहे.

वाघ येतो पण तिला आपल्या वासराची-डुब्याची आठवण येते. ' मला खाण्यापूर्वी मी आपल्या डुब्याला पाजून येतें ' असें म्हणून ती जाते. डुब्याला तिचा पान्हा आज निराळाच आहे, तिला कसलें तरी तीव्र दुःख झालें आहे हें समजतें. तो विचारतो व ती त्याला सर्व सांगते. डुब्याचें आईवर फार प्रेम असतें म्हणून तो वाघाला म्हणतो मला खा. वाघ शेवटीं भवळाला खातो व डुबा मग आपल्या आईच्या अंगोपांगांवरून गाणें म्हणतो असा शेवट मला मिळालेल्या कथेंत केला आहे. कांहीं वेळां दोघांचें प्रेम पाहून वाघाला पाझर फुटतो असाहि शेवट केलेला आढळतो.

भवळाच्या अंगाचें केलेलें वर्णन मोठें मजेदार व सार्थ आहे. तिच्य प्रत्येक अवयवाला दिलेल्या उपमा पाहिल्या तर गाणारीच्या कल्पनाशक्तीचें कौतुक वाटतें. गाईबद्दलच्या पवित्र कल्पना या वर्णनांतून सर्वत्र दिसतात. म्हणूनच शिंगांना महादेवाचीं लिंगें, कानांना नागवेलीचें पान, कपाळाच्या भव्यतेचें वर्णन करण्यासाठीं त्यांत गोपाळ निजले आहेत अशा उपमा दिलेल्या आहेत. भवळाची पाठ म्हणजे पंढरीची वाट आहे, तिच्या मांड्या म्हणजे पालखीच्या दांड्या आहेत. दूध, दही, तूप देऊन ती आपल्याला ऋणी करते, त्याप्रमाणें तिचें शेण व मूत्रही उपयुक्त आहे या सर्व कल्पनांचा उपयोग या गीतांत केलेला आहे.

लोकवाङ्मयांतील अतिरंजिततेला अनुसरून डुब्याला बांधलेलें असतें तें सोन्याच्या दाव्यानें व रुप्याच्या मेखांनीं—

---

" प्रतिभे "च्या २०-२-३३ च्या अंकांत श्री. रा. म. आठवले यांनीं हें सबंध कथात्मक गीत दिलें आहे. पांढरपेशा वर्गांतील तें गीत आहे. त्यांत कथेचा शेवट गोड केला आहे व प्रत्यक्ष परमेश्वरच वाघाचें रूप घेऊन बहुळेची व डुब्याची परीक्षा घेण्यास आला होता व त्या दोघांचें परस्परांवरील प्रेम पाहून तो प्रसन्न झाला व गाईला त्यानें आपल्या मंदिरांत गोमुखाचे रूपानें व वासराला नंदीचें रूपानें कायमचें स्थान दिलें अशी कथा आहे. या गीताचें भ्रमण होतांना कथेंतील हा शेवटचा धर्मनिष्ठ भाग गळालेला दिसतो.

हें गात स्त्रिया पंचमीच्या फेरावरहि गातात.

## १. भवळा गाईचें गाणें

साता नंदाचं देऊळ ।
गाई जन्मिली भवळ ।
चारा नेहरीं[२] चरली ।
पाणी प्याया उतरली ।
देखिली वनींच्या वाघांनीं ।
वाघः—
" खावं खावं भवळा तुला ।"
भवळाः—
" नको खाऊं वाघा मला ।"
घरीं माझा डुबा[३] तान्हा ।
त्याला देईन पहिला पान्हा ।
मग खार वाघा मला ।"
भवळा वासराकडे जाते-
भवळा तेथून निघाली ।
लागली वनाच्या वाटला ।
एक वन वोलांडिलं ।
दुसऱ्या वनाला लागली ।
दोन वनं वोलांडिलीं ।
तिसऱ्या वनाला लागली !
तीन वनं वोलांडलीं ।
चौथ्या वनाला लागली ।
चौथ्या पांचव्या वनाला ।
डुब्या बाळानं देखिली ।
तोडलं सोनीयाचं दावं ।
उपटलीं रुपीयाचीं नखं ।
डुबा कोपानं उडाला ।
जाऊन कासेला भिडला ।
वाचा फुटली डुबियाला ।
डुबाः—
" अग अग भवळाबाई ।
रोजचा पान्हा अमृताचा ।
आजचा पान्हा रगताचा ।"
भवळा—
" काय सांगूं डुब्या बाळा ? ।
चारा नेहरीं चरलें ।
पाणी प्याया उतरलें ।
देखिलं वनींच्या वाघानं ।
" खाऊ खाऊ भवळा तुला ।"
" नको खाऊ वाघा मला "।
" घरीं माझा डुबा तान्हा ।"
त्याला देईन पहिला पान्हा ।"
भवळा व डुबा दोघेही वाघाकडे जातात—
डुबा तेथून निघाला ।
लागलीं वनाच्या वाटला ।
एक वन वलांडिलं ।
दुसऱ्या वनाला लागलीं ।
दोन वन वलांडिलीं ।
तिसऱ्या वनाला लागलीं ।
तीन वनं वलांडिलीं ।

---

( २ ) किनाऱ्यावर. ( ३ ) वासरू.

चौथ्या वनाला लागलीं ।
चौथ्या पांचव्या वनाला ।
गेलीं वाघाच्या जवळीं ।
डुब्या बोलतो वाघाला ।

डुबा—

" आधीं खार वाघा मला ।
मग खार भवळाला "

भवळा—

" आधीं खार वाघा मला ।
मग खार डुबियाला । "
वाघ भवाळाला खातो—
वाघ किराण[1] साधिलं ।
नरडं भवळाचं फोडिलं ।
डुबा रडूंहि लागला ।
डुबा आईवरून गाणें गातो—
" माझ्या भवळाचीं शिंगं ।
महादेवा तुझीं लिंगं ।
माझ्या भवळाचे कान ।
नागिलीग तुझें पान ।
माझ्या भवळाचं कपाळ ।
आंत निजले गोपाळ ।
माझ्या भवळाचा गळा ।
जसा तेलीयाचा नळा ।
माझ्या भवळाची पाठ ।
जशी पंढरीची वाट ।
माझ्या भवळाचं पोट ।
जशी कापसाची मोट ।
माझ्या भवळाची कास ।
तिला पिळी रामदास ।
माझ्या भवळाच्या धारा ।
सोनियाच्या तारा ।
माझ्या भवळाची शेप ।
नागीण टाकी झेप ।
माझ्या भवळाच्या मांड्या ।
जशा पालखीच्या दांड्या ।
माझ्या भवळाचं दूध ।
जेवण माझं झालंय सूधं
माझ्या भवळाचं दही
जेवण माझं झालंय लई ।
माझ्या भवळाचं तूप ।
जेवण मला झालंय खूप ।
माझ्या भवळाचं ताक ।
जेवण मला झालंय पाक ।
माझ्या भवळाचं शेण ।
सारवील चारी कोनं ।
माझ्या भवळाच्या गोमुतानं ।
देव झालं पैतार[2] " ।

---

( १ ) किराण=नेम.    ( २ ) पैतार=पवित्र.

" गाईचा पाळणा " देखील पंचमीच्या फेरावरच गाइला जातो. त्यांत हेंच वर्णन आहे. गाईच्या पोटाला " कापसाची मोट " आणि तिच्या नाकाला " कोल्हापूरचं माप " या उपमा मोठ्या गमतीच्या वाटतात—

## ( २ ) गाईचा पाळणा—

गाय भरून गाईच्या मांड्या ग जशा पालखीच्या दांड्या
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचा शेपा ग जसा नागीण टाकी झेपा
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं पोट ग जशी कापसाची मोट
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईची कास ग धार काढी रामदास
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं दुधु ग आज जेवण झालं सुधु
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं दही ग आज जेवण झालं लई
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं ताक ग आज जेवण झालं पाक
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं तुपु ग आज जेवण झालं खुपु
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईची पाठ ग जशी स्वर्गाची वाट
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचा डोळा ग जसा लोण्याचा गोळा
गोकुळच्या नारी ।
गाय भरून गाईचं नाक ग जसं कोल्हापूरचं माप
गोकुळच्या नारी ।

**गाय भरून गाईचं तोंड ग महादेवाचीं कुंडं**
**गोकुळच्या नारी**
**गाय भरून गाईचं कपाळ ग जस महादेवाचं गोपाळं[1]**
**गोकुळच्या नारी[2]।**

( महार— सातारा जिल्हा )

" हरणीचें गाणें " बहुळाच्याच धर्तीवर आहे. पण त्याचा शेवट गोड आहे :—

—मायलेकांचें प्रेम पाहून राजा खूष होतो व दोघांना सोडून देतो असा त्याचा शेवट आहे.

## ( ३ ) हरिणीचें गाणें—

**तिलोकीचा[3] दाता कर्ता तो नारायण।**
**समदं दिलस देवा कांहीं नाहीं उणं।**
**पोटीं बाळ नाहीं तान्हं।**
**दिलं देवानं अद्रेमानं[4]।**
**हरण राहिली गरवार।**
**हरणीचे नऊ महिने आलेत भरून।**
**झाली फुर्सत येळ।**
**पोटीं बाळ जल्मलं तान्हं।**
**कुण्या ग योगीं येऊन।**
**पाहिलं फासे-पारध्यानं।**
**दडत लपत येऊन।**

---

१ ' गोपाळ ' हा ' गोकुळ ' चा अपभ्रंश झाला असावा.

२ आणखी एका स्त्रीनें गाइलेल्या गाण्यांत " गाय म्हणून गाईचे खूर तिथं रचलय पंढरपूर" असा एक चरण अधिक होता. ३ त्रैलोक्य. ४ आदरमान.

फास टाकला चौकुन ।
त्याग फाशामधीं गुतली हरण मिरग ।
लावली गळ्यास दोरी ।
चालला पारधी घरास घेऊन ।
"दो दो रुपया राजा विकलय कारण" ।
झाली राजाला खुशाली "घ्यात्रा बोलावून" ।
स्वैपाकाचा वेळ झाला ।
बोलवा मुलाण्याला[1] ।

हरिणीः—

"मुलाण्यादादा मुलाण्यादादा जरा होय जामीन ।
घरीं वो तान्हं बाळ दूध मी येतें पाजून" ।

मुलाण्याः—

"तुम्हीं जंगलचे जानवर काय तुमचं इमान ?
हरण आली तवरी नाहीं, तर कापाल मुलाण्याची मान" ।
धावत पळत गेली बाळा कारणं ।

हरिणीः—

"पे पे बाळा मला जायाचं परतून" ।
पेया गेलं बाळ कडू लागलीं चारीं थानं ! ।

पाडसः—

"कां ग माता कडू दूध ? सांग वर्तमान ।

हरिणीः—

"काय ग करूं बाई नेलं पारध्यानं धरून" ।
नाहीं प्यालं बाळ आली संग घेवून ।

---

१ खाटीक

**पाडसः—**

**" माझं वो कोवळं मांस राजा कर तूं भोजन " ।**
**झाली राजाला खुशाली हरणी मिरग दिल्यात सोडून ।**
**(मराठा स्त्री–जिल्हा पुणें)**

फेरावरचीं गाणीं हीं बहुधा कथात्मक असतात. कथांमधून अद्‌भुतता, अवास्तवता, अतिशयोक्ति यांचा उपयोग सढळ हातानें केलेला असतो. सासु-सुनांमधील किंवा नणंदा-भावजयांमधील परस्पर द्वेषाची भावना रंगवितांना एकीला दुसरीचा वध करायला प्रवृत्त झालेली दाखविणें, लहान मुलांच्या "सोनसाखळी"च्या गोष्टीप्रमाणें माणसांना मारल्यावर त्यांचीं झाडें होणें, तीं झाडें बोलूं लागणें यांसारख्या अवास्तव कल्पना नेहमीं आढळून येतात. बायकोला भावानें मारल्यानंतर बारा वर्षांनीं ती नवऱ्याच्या स्वप्नांत जाते तेव्हां नवरा धावून येतो. या बारा वर्षांत नवऱ्याला तिची चौकशी देखील करावीशी वाटत नाहीं. सोनसाखळीची गोष्ट लहान मुलें जितक्या भाबडेप-णानें पण डोळे ताणून व कान टवकारून ऐकतात तितक्याच भाबडेपणानें अशिक्षित स्त्रिया हीं गाणीं गात असतात. लहान मुलांच्या व अशिक्षित जनमनाच्या मनोव्यापारांत पुष्कळसें साम्य असतें म्हणतात, त्याचें प्रत्यंतर या कथा–गीतांतून येतें; वर्णनें करतांना केलेली पुनरावृत्ति, तोच तोपणा पाहिला तर सुशिक्षित माणसाला वाटेल "काय चऱ्हाट लावलें आहे ! समजलें काय म्हणायचं आहे तें" पण खेडवळ स्त्रिया गाऊं लागल्या म्हणजे त्यांतच रममाण होऊन "एक वन वलांडिलं, दोन वनं वलांडिलीं" पासून पांच वनांपर्यंत गात जातात, पांच लिंबें झेलण्यापर्यंत तेंच पालुपद म्हणत जातात. तीन अस्वलांच्या गोष्टींत ज्याप्रमाणें बाबा-अस्वल येतें मग आई-अस्वल येतें व मग बाळ-अस्वल येतें व तीच ती गोष्ट प्रत्येका-बाबत सांगितली जाते त्याप्रमाणें "अग अग माझे आई" म्हणत बाळाई जें सांगते तेंच ती "अरे अरे माझे बापा" म्हणून सांगतें, तेंच भावाला सांगते, बहिणीला सांगते व गाणें लांबत जातें. भारजा वारूळाला निघाली कीं "वाण्या बामणाच्या" मुलींकडे जाते मग "तेल्या तांबोळयांच्या"

मुलींकडे जाते, मग "चांभार कुंभाराच्या" मुलींकडे जाते आणि तेंच तें पालुपद गाते. दागिन्यांवरून गाणें आलें म्हणजे "कुडी" वरून गाईलें जातें तेंच पालुपद घेऊन "सरी" वरून गाईलें जातें, तेंच पालुपद घेऊन "डोक्यांतलें फूल" वरून गाईलें जातें आणि गाणें हवें तितकें लांबिवलें जातें. ही पुनरावृत्ति व तोच तोपणा काढला तर कथात्मक भाग थोडाच शिल्लक राहतो.

श्रावण महिना हा महाराष्ट्रांतील स्त्रियांच्या उत्सवाचा, आनंदाचा महिना. मुलींना या महिन्यांत माहेरीं आणण्याची चाल आहे. पांढरपेशा वर्गांत मुलींच्या मंगळागौरी साजऱ्या केल्या जातात, शिवामूठ वाहिली जाते. शेतकरी स्त्रियांत नागपंचमीचा सण मोठा असतो "बाळाई" ला तिची आई माहेरीं आणवते. आनंदोत्सवासाठीं बाळाआी भावजयीचें नवें लुगडें नेसायचें म्हणून हट्टून बसते. पण तें नेसल्यावर पूजा करतांना त्याला हळदीकुंकवाचे डाग पडतात म्हणून भावजय नवऱ्याला नणंदेचा वध करायला सांगते. भाऊ बहिणीला सासरीं घालवायला म्हणून जातो व तिचा वध करतो. बाळाआी बारा वर्षांनीं नवऱ्याच्या स्वप्नांत जाते. बाळाआी, मोगरा कुत्रा व शेवंती मांजर या तिघांची जाई, मोगरा व शेवंतीचीं झाडें झालेलीं असतात. त्यावर पंचामृत शिंपडून नवरा त्यांना जिवंत करतो.

नणंदाभावजयांचा परस्पर द्वेष दर्शविण्यासाठीं केलेली अतिरंजितता कमालीची आहे. अद्‌भुतता आहेच. पण त्याबरोबरच कल्पनाचातुर्य व शब्दयोजनेची कुशलताही आढळते. "ढवळापवळा" नंदी सजवायला "मखमल मूठ" "रेशमी पटाड" "धांगऱ्या चराळ" घेतलें आहे. "तान्हभूक लाडू" हा शब्दप्रयोग तर या गीतांतून पुष्कळदां दिसतो. प्रवासाला निघतांना तहानेकरतां व भुकेकरतां घ्यावयाची शिदोरी या अर्थी हा शब्दप्रयोग करण्यांतील योजकता कौतुकास्पद आहे. माहेरीं किंवा सासरीं पाठवतांना सासू व आई म्हणतात मदुरेचा बाजार येऊं दे. बाळाआीला नवे कपडे वगैरे घेऊन मग न्यावी. बाळाआीचा साजशृंगारहि पहा— "पिवळा पीतांबर" "करगती शेला" "मदमा काचोळी" ती

घालते. कुंकू-काजळ तांबुलांनीं ती सौंदर्य नटवते. बाळाअीच्या बरोबर असलेल्या कुत्र्याला " मोगरा " व मांजरीला " शेवंती " नांवें देण्यांतहि कल्पकता आहे. कारण नंतर त्यांची "जाई", " मोगरा " व " शेवंती " चीं झाडें होतात.

## ( ४ ) बाळाई

आई म्हणते—
" लोकाच्या लेकी या माहेरीं
आमची बाळाई सासरीं
आतां सुभान बंधु जावें
बाळाईला आणाया "
सुभान्या जातो—
गेला गाईच्या गोठ्याला
सोडला ढवळा पवळा नंदी
काढलं मखमलमूठ[1]
ओढलं रेशमी पटाडं[2]
घातल्या घांगऱ्या चराळ
घेतलं तान्हंभूक लाडू[3]
निघाला वाड्याच्या बाहेरीं
लागला वनाच्या मारगीं
एक वन वोलांडिलं
दोन वनं वोलांडिलं
तीन वनं वोलांडिलं
चवथ्या पांचव्या वनाला
लागलंय नगर दिसाया
गेला नगराजवळीं
गेला नगराच्या आंत
बाळाईच्या सासरीं—
बंधुनीं गाडी जी सोडिली
गेला वाड्याच्या आंत
बसाया टाकिला पाट
झारी भरून पाणी दिलं
सुभान्या म्हणतो—
" नाहीं पाणी जी पियाचं "
सुभान बोलतो बहिणीला
सासऱ्याला म्हणतो—
" बाळा धाडा एक रात
येऊं द्या मदुरीचा हाट
भरूं द्या कौलारी पेठ[4] "
बाळाईची तयारी—
घेतलं पिवळं पितांबर
घेतला करंगती[5] शेला
घेतली मदमा काचोळी
आली आपल्या वाड्याला

---

१ मखमली झूल २ बैलाच्या पाठीवरील खोगीर ओढण्याचें साधन ३ तहानेची व भुकेची शिदोरी ४ बाजार ५ हातांत (?) कीं हें एक विशेषण आहे ? शेल्याचा प्रकार ?

पेटिवल्या कातीव[1] चुली
पाणी ठिवलं घंगाजळी[2]
बाळाई न्हायाला बसली
बाळाई न्हाऊन उठली
नेसली पिवळं पीतांबर
घातली मदमा काचोळी
घेतला करगती शेला
ललाट भरलं कुंकवानं
नेत्र भरलं काजळानं
मुख भरलं तांबुलानं
घेतलं तान्हभूक लाडू
घेतली शेवंती मांजर
घेतला मोगरा कुतरा
निघाली वाड्याच्या बाहेरी
सुभान्या निघतो—
सुभान बंधुजी उठला
गेला गाईच्या गोठ्याला
सोडला ढवळापवळा नंदी
घातलं मखमल्यामुठ
वोढलं रेशमी पटाडं
घातल्या घांगऱ्याचराळ
वाटेला लागतात—
बाळाई गाडींत बसली
निघाली येशीच्या मारगीं
एक वन वोलांडिलं
दोन वनं वोलांडिलं
तीन वनं वोलांडिलं
चौथ्या पांचव्या वनाला
लागलंय नगर दिसाया
माहेरीं—
गेली नगराजवळीं
तिकडनं आली धाकली बहीण
"अग अग माझे आई
आपली बाळाई आली"
बाळाई गाडीतनं उतरली
घेतली शेवंती मांजर
घेतला मोगरा कुतरा
घेतलं तान्हभूक लाडू
गेली वाड्याच्या आंत
पेटिवल्यां कातीव चुली
पाणी ठिवलं घंगाजळीं
बाळाई न्हायाला बसली
बाळाई न्हाऊन उठली
गेली आईच्या जवळीं
बाळाई म्हणते—
"अग अग माझे आई
मला नेसायला कांहीं"
आई म्हणते—
"नेस जा पिवळं पीतांबर"
बाळाईचा हट्ट—
"नग मला पीतांबर
मला हौजीची[3] कासई[4]"

---

१ कोरीव-कातून केलेल्या. २ गंगाजळ—घंगाळ. ३ भावजय ४ नवें लुगडें.

आई—
" कासई नव्हग आपली
कासई तिच्या माहेराची "
तिथनं बाळाई झडकली
गेली बापाच्या जवळीं

( याप्रमाणें आई, बाप, बहीण भाऊ यांच्याकडे ती जाते व वरीलप्रमाणें संवाद प्रत्येकाशीं होतो नंतर—)

तिथनं बाळाई झडकली
गेली वहिनीच्या जवळीं
भावजयीला म्हणते—
" अग अग माझी भावज
मला नेसायला कांहीं "

भावजय—
" नेसा पिवळं पीतांबर "

बाळाई—
" नग मला पीतांबर
मला तुमची कासई "

भावजय—
" हाये सातीसलदला[1]
ठेवली सातीसलदला "

बाळाई कासई नेसून नागपूजेला जाते—
घेतली सोनियाची शिडी
गेली सातीसलदला
काढली होंजीची कासई
नेसली होंजीची कासई
ललाट भरलं कुंकवानं
नेत्र भरलं काजळानं
मुख भरलं तांबुलानं
बाळाई लाह्याची भाजिल्या
तिनं सयां[2] गोळा केल्या
गेल्या यमुना नईला
पांच फेरजी नाचील्या

कासई खराब होते—
एक डाग कुंकवाचा
दुसरा डाग हळदीचा
तिसरा डाग काजळाचा
आली आपल्या वाड्याला
वयनीनं कासई देखिली

बाळाईला वधण्याची आज्ञा—
वहिनी कंताला बोलती
" कासजी नको ग मला
बाळाईला वधावी

---

१ सातीसलद-सलद = पेटी; सातव्या पेटींत म्हणजे अगदीं खोल असा भावार्थ, पेट्या किंवा उतरंडी देखील एकावर एक रचून माळ्यावर ठेवण्याची प्रथा शिडीच्या उल्लेखावरून दिसते. २ मैत्रिणी.

त्यांत कासई भिजवावी
खडोखडी वाळवावी
मंग तिची घडी करावी "
बंधु आईला बोलतो
" जातो बहिणीला घालवाया "
माता बंधुला बोलती
" येऊं द्या मदुरीचा हाट
भरूं द्या कौलारी पेठ "

बाळाई निघण्याची तयारी करते—

आला मदुरेचा हाट
भरली कौलारी पेठ
घेतलं पिवळं पीतांबर
घेतला करगती शेला
घेतली मद्‌मा काचोळी
आली आपल्या वाड्याला
पेटिवल्या कातीव चुली
पाणी ठिवलं घंगाजळीं
बाळाई न्हायाला बसली
बाळाई मातेला बोलली
" चांगलं न्हाऊं घाल ग आई
परतून मला येणं नाहीं "

आई विचारते—

" अशी कां बोलती बाळाबाई
सुभानबंधु संग हाई "

बाळाईचा संशय—

" भाऊ नव्हती वयरी[1]
त्याच्या कंबरेला सुरी
घालील माझ्या शिरीं
हौसेच्या बांगड्या भर ग आई
परतून मला येणं नाहीं
लुगडं घे ग चांगलं आई
परतून मला येणं नाहीं "

दोघी निघतात—

केल तान्हभूक लाडू
सुभान बंधुजी उठला
गेला गाईच्या गोठ्याला
बंधुनं गाडीजी जुपली
तिनं सया गोळा केल्या
बाळाई सयाला विचारिती
" मी ग सासऱ्याला जाती
चांगलं सयानो भेटा ग बाई
परतून मला येणं नाहीं "

सया—

" असं कां बोलती बाळाबाई ?
सुभानबंधु संग हाये "

बाळाई—

" भाऊ नव्हती वयरी
त्याच्या कंबरेला सुरी
घालील माझ्या शिरीं "

---

१ वैरी

बाळाईचा वध—

बाळाई गाडींत बसली
निघाली येशीच्या बाहेरीं
लागली वनाच्या मारगीं
एक वन वोलांडिलं
दोन वन वोलांडिलं
तीन वन वोलांडिलं
चौथ्या पांचव्या वनाला
निघाली अरण्या वनाला
बहीण बंधुला बोलती
" अरे अरे बंधु
मला नेतो कोणच्या वना ?
भाऊ नव्हती वयरी
भावजयीच्या कासईसाठीं
मला वधाया आणली "
बाळाई गाडीतनं उतरली
काढली शेवंती मांजर
घेतला मोगरा कुतरा
त्यानं तिन्हीजी वधिलीं
त्यानं कासई भिजविली
खडोखडी वाळवली
मंग तिची घडी केली
बंधुनं गाडीजी जुपली
निघाला आपल्या घराला

बाळाईचा पती तिला जिवंत करतो—

बारा न् बारा वर्षं झालीं
स्वप्नीं कंथाच्या गेली
" आहो आहो स्वामी
तुम्हा झोप कशी आली ?
मला भावानं वधिली
त्यांत कासई भिजाविली
खडोखडी वाळविली
मंग त्याची घडी केली
निघून गेला आपल्या वाड्याशीं "
दुसऱ्या दिवशीं सकाळच्या पारीं
स्वामीनं आंघोळ करुनी
कंथ भोजन जेवला
निघाला आपल्या सासुरवाडी
गेला सासुरवाडीला
" बाळाई धाडा एक रात "
सासु बोलती जावयाशीं
" अहो तुम्ही स्वामी
तुम्ही कांहो येणं केलं ?
जावई—
" आलों न्यायाच्या कारणीं[१] "
सासू—
" बाळाईला नेऊन घालविली "
स्वामी क्रुद्धानं दाटला

---

१ नेण्यासाठीं

बाळाईच्या बंधुला बोलला
" कशी आणलीस वैरी ?
तुका बाळाई वधिली "
खूण वनाची सांगितली
गेला अरण्य वनाला
एक झाड जाईचें मधें
एक झाड मोगरीचें
एक झाड शेवंतीचें
बाळाई स्वामीला बोलती
" तुम्ही हळूंच हात लावा "
हात लावल्यानंतर
झाड बोलूंची लागलं
" शोध करूनी आम्हा
भावजईच्या कासईसाठीं
मला बंधुनं वधिली "
काढली पंचामृताची कुपी
त्यांनी झाडावर शिंपली
बाळाई त्यानं सूध केली
केली शेवंती मांजर
केला मोगरा कुतरा
तिघांशीं भोजन घातलं
स्वामी घेऊन निघाला
आला आपल्या वाड्याला
स्वामी राज्य करूं लागला[1]
( चांभार स्त्री–जिल्हा पुणें )

भारजाची कथा निराळी आहे. नागपंचमीच्या दिवशीं भारजा नागपूजेला जाते. सासू दळण कांडण करून घेतल्याशिवाय तिला सोडीत नाहींच. नवरत्नाचा हार घालून भारजा जाते. सर्व मैत्रिणींना घेऊन जाते. पूजा करून फेर नाचतांना हार तुटतो. सर्व मैत्रिणी निघून जातात. मोती वेचतांना भारजाला रात्र झाली म्हणून सासरीं माहेरीं तिला कोणी घरांत घेत नाहीं. सासरचे लोक माहेरीं जायला सांगतात. माहेरचे लोक सासरीं जा म्हणतात. शेवटीं अगतिक होऊन भारजा आत्महत्या करायला अंजनडोहाची वाट विचारते. अखेर एक धनगर तिचा हार घेऊन तिला वाट दाखवतो. भारजा आत्महत्या करते. नागपंचमी भारजाला अशी भोंवते.

भारजेच्या श्रृंगाराचें वर्णनहि पहा. नेसायला " चंद्राचा पाट " घेते. " मदमा काचोळी " घालते. हार घालते तोहि " नवरत्नांचा " नाग-

---

१ अशाच आशयाचें पण एक लहानसें गीत " भावजयीचा सूड " हें म. सा. प. च्या जून १९३१ च्या अंकांत श्री. डोंगरे यांनीं दिलें आहे.

पूजेला थाळीभर लाह्या, लोटीभर दूध, हळदीचा ओंडा, कुंकवाचा करंडा, पोवतं सर्व तयारी जय्यत असते.

भारजा वारुळाला जातांना वाण्या-बामणांच्या मुलींपासून म्हारमराठ्याच्या मुलींपर्यंत सर्वांना बोलावते. याचा अर्थ महाराष्ट्रांतील जातीयता नागपंचमीसारख्या उत्सवाच्या आड येत नाहीं, असें मुळींच नाहीं. अद्यापही खेड्यांतून व शहरांतून जातीयतेचे बंध मोठे आहेत व व्रतवैकल्यांच्या प्रसंगीं तर हीं बंधनें मुळींच सैल झालेलीं नाहींत. मराठ्यांच्या मुली वेगळा फेर धरतील, साळ्या कोष्ट्याच्या वेगळा धरतील आणि महाराच्या वेगळा धरतील. सासर माहेरच्या सर्व नातलगांकडे भारजा जाते व प्रत्येक ठिकाणीं तिला तेच नकारार्थी उत्तर मिळतें. तोच तोपणा व गाणें वाढवणें एवढाच त्याचा उद्देश इथें आहे. अंजनडोहाचा रस्ता विचारायला भारजाला हत्ती, घोडे, म्हशी, बैल, मेंढ्या, शेळ्या या प्रत्येकाचा खिलारी भेटतो तो केवळ गाणें लांबविण्याकरतांच. सुचतील ते सर्व प्रकार अशा वेळीं गाणारी घालत असते. डोहांत उडी घेतांना भारजाची पूर्व तयारी देखील चोख आहे. कासोटा घालून, पदर सावरून, केसाची जुडी बांधून, प्रथम दगड टाकून ती पाण्याच्या खोलीचा अंदाज घेते व नंतर स्वतः उडी टाकते.

भारजाची कथा म्हणजे हजारों वर्षांतल्या हिंदु स्त्रीच्या अभागी करुण कहाणीचें प्रतीक आहे. हिंदु स्त्रीचें सारें वैभव, सारी प्रतिष्ठा, इतकेंच नव्हे तर सारें जीवन हें तिच्या माहेरच्या किंवा सासरच्या लोकांवर अवलंबून. दोन्हीकडील तिचा आधार तुटला तर जगणें देखील तिला मुश्कील. हेंच या कथेंतील वास्तविक सार आहे.

## ( ५ ) भारजा :

**भारजा—**

**" आली वर्षाची पंचम**
**आत्यां[1] मी जातें वारुळांला[2]**

**सासू—**

**" वेडी झालीस भारजा**
**मणभर गहूं दळायचें**

१ सासू २ नागपूजेला

पति वंजाया[1] जायाचे "
मणभर या गव्हाचा
याचा केला एक घाणा[2]

भारजा—

" आली वर्षाची पंचम
आत्या मी जातें वारुळाला "

सासू—

" वेडी झालीस भारजा
मणभर साळी सडायाच्या
पति वंजाया जायाचा "
मणभर या साळीयाचा
याचा केला एक घाणा

भारजेचा शृंगार—

भारजा न्हायाला बसली
भारजा आंघोळ करून उठली
नेसली चक्रांचा[3] पाट
त्याली मदमा काचोळी
त्याली सर्व अळींकार[4]
त्याली नवरत्नाचा हार
गेली गांवामधीं

भारजा—

" वाण्या बामणाच्या मुली
वारुळाला येता कुणी ?
तेली तांबुळयाच्या मुली
वारुळाला येता कुणी ?
साळया कोष्ट्याच्या मुली
वारुळाला येता कुणी ?
म्हार मराठ्याच्या मुली ?
वारुळाला येता कुणी ?

भारजा पूजा करते—

साऱ्या सया मिळवून आणल्या
आली आपल्या वाड्याला
घेतल्या थाळीभर लाह्या
घेतलं लोटीभर दूध
घेतला हळदीचा ओंडा
घेतला कुंकवाचा करंडा
घेतलं नागाला पोवतं[5]
निघाली वाड्याच्या बाहेरी
खेळत गेल्या वारुळाजवळीं
भारजानं वारुळ पूजिलं
वाह्यल्या थाळीभर लाह्या
वाहिलं लोटीभर दूध
वाहिला हळदीचा ओंडा
वाहिला कुंकवाचा करंडा
वाहिलं नागाला पोवतं
भारजानं फेरजी धरीला
एक फेरजी फिरल्या
दोन फेरजी फिरल्या

---

१. विक्री करायला. २ एका बैठकींत दळण उरकलें. ३ चक्राकार चित्रांचें लुगडें ४ अलंकार. ५ श्रावणी पौर्णिमेस देवाला अर्पण करावयाचा दोरा.

तीनं फेरजी फिरल्यां
चवथ्या पांचव्या फेराला
भारजाचा हार तुटतो—
तुटला गळ्यांतील हार
भारजानं फेरजी सोडिला
लागली मोती वेंचायाला
सया निघून गेल्या घरला
मोती वेचता झाली रात्र
भारजानं मोतीजी वेचिले
वाटमारगीं लागली
आली आपल्या वाड्याला
हाका मारली सासूला

भारजा—

" आवो आवो सासूबाई
मला घरामधीं घ्यावं

सासू—

" आमचीं कवाडं सार्यांचीं[1]
कुलपं निघना तांब्याचीं
एवढ्या रातचं काय ग काज ?
जा माहेरीं कर जा राज"

( याप्रमाणें सासरा, दीर, जाऊ, पति या सर्वांच्या महालीं जाते व प्रत्येकाकडून तेंच उत्तर मिळाल्यावर माहेरीं जाते )

माहेरीं—

भारजा तेथून निघाली
वाटमारगीं लागली
आली वेशीच्या बाहेरी
लागली वनाच्या वाटेला
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
आलं भारजाचें माहेर
गेली वेशीच्या आंत
गेली बापाच्या वाड्याला

भारजा—

" अर अर माझ्या बापा
माझा बापची होशील
मला घरामधीं घेशील "

बाप—

आमचीं कवाडं आंब्याचीं
कुलपं निघना तांब्याचीं
येवढ्या रात्रीचं काय ग काज ?

( याप्रमाणें भारजा आई, भावजय, बहीण या सर्वांकडे जाते व तिला तेंच उत्तर मिळतें )

अखेर आत्महत्या करण्यास निघते—

---

१ सागवानी.

भारजा तेथून निघाली
आली येशीच्या बाहेरी
लागली वनाच्या वाटला
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
भेटलीं हत्तीचीं खिल्लारं

भारजा—

" अर अर खिलाऱ्यादादा
येवढा शिनगार देतें तुला
अंजनडोह दाव मला "

हत्तीचा खिलारी—

" येवढा शिनगार नको बाई
अंजनडोह ठाव नाहीं "

( याप्रमाणें घोड्याचीं, उंटाचीं, म्हशीचीं, बैलाचीं, गाईचीं, मेंढ्यांचीं खिलारं भेटतात व प्रत्येक खिलाऱ्याशीं हाच संवाद होतो. अखेर–)

तिथनं म्होरच निघाली
भेटलीं शेळ्यांचीं खिलारं

भारजा—

" अर अर खिलाऱ्या दादा
एवढा शिनगार देतें तुला
अंजनडोह दाव मला

शेळ्यांचा खिलारी—

" एवढा शिनगार देग बाई
अंजनडोह ठाव आहे "

काढला सारा शिनगार
त्याचं गाठोडं बांधीलं
दिलं खिलाऱ्यादादाला
" तूंच जन्माचा मायबाप "
गेली डोहाच्या जवळीं
घातली आपली कांस[2]
दंडीं पदर सावरीला
बांधली केसाची जुडी
आधीं टाकिला खडा[3]
मग टाकिली काडी
मग घातयीली उडी
नागरपंचमी भोवली भारजाला
परणाचा घात झाला

( महार स्त्री–पुणें जिल्हा )

" जैता " च्या गाण्यांत मायलेकींच्या प्रेमाची कोमलता एका नावीन्यपूर्ण प्रकारानें दर्शविली आहे नागपंचमीच्या फेराला जायला निघते म्हणून जैताची सासू तिला दटावते. जैता रागावून माहेरीं निघून जाते. पण माहेरीं ती दासी म्हणून राहते. दळण दळायला दिलं तेव्हां ती जात्यावर

१ शृंगार. २ कासोटा. ३ पाण्याच्या खोलीचा अंदाज घेण्याकरतां.

ओव्या गाऊं लागली. त्या ओव्या आईबापांच्या व भाऊभावजयीच्या नांवानें गाते तेव्हां आईला जैताच्या आवाजाची आठवण होऊन ती रडते. भावजय तिला म्हणते " जैताचा आवाज कुठला ? जैता तर " सात कोढ उपर माडी "वर नांदते आहे." आईबाप जैताला ओळखीत कसे नाहींत हा प्रश्न बाजूलाच ठेवायचा.

**( ६ ) जैता**

**जैता पंचमीच्या फेराला जाते—**

आली वर्षाची पंचम
चल ग जैता खेळाया
ठिवलं घंगाळांत पाणी
गेली अष्टीच्या[1] घरांत
काढलं अष्टीचं पातळ
गेली मदम्या[2] घरांत
काढली मदमा काचोळी
घेतला झरझेरा[3] रुमाल
हळदी कुंकवाच्या पुड्या
अबीर बुक्काईच्या पुड्या
निघाली वाड्याच्या बाहेरी
गेली नदीच्या नेहरीं[4]

**सासू दटावते म्हणून जैता रागावून निघून जाते-**

तिला डोळ्यान दापिली
रडत फुंदत वाड्यांत आली
गेली अष्टीच्या घरांत
फेडलं अष्टीचं पातळ
गेली मदम्या घरांत
काढली मदमा काचोळी
दोन वर्षांचं[5] लुगडं
तीन वर्षांची चोळी
निघाली वाड्याच्या बाहेरी
गेली नदीच्या नेहरीं
लागली वनाच्या मारगीं
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
दिसलं जैताचं माहेर

**जैता माहेरीं दासी म्हणून राहते--**

दिसलं जैताचं माहेर
गेली नदीच्या नेहरीं
पाण्या आल्या होत्या दासी

**जैता—**

" तुम्ही दासी कोणाच्या ? "

१ अष्टी-अष्टीचं पातळ ज्या खोलींत ठेवलं ती खोली. २ मदम्या घर-मदमा काचोळी ज्या खोलींत ठेविली होती ती खोली. ३ रेशमी. ४ किनाऱ्यावर. ५ दोन वर्षांचं जुनं.

दासी—
"आम्ही बापू रतनाच्या"
जैता—
"बापू रतनाला सांगा
आली मुलुखावरली दासी
करील दळण मळण
खाईल कलनाची[1] कोंडा"
तिला वाड्याला नेली
एक रातराजी[2] गेली
दुसऱ्या रात्रीं दळण दिलं
जैताच्या ओव्या—
"पहिली ग माझी ओवी
बापा माझ्या रतनाला"
माता रडे घळघळा
आई—
"माझ्या जैताचा गळा"
सून बोलते सासूला
भावजय—
"वेड्या झाल्याजी आवोजी
सात कोट उपर माडी
तेथं नांद जैता लाडी
नख नदर पडना
मुख कुठलं पडाया?"
जैता—
"दुसरी ग माझी ओवी
माता माझ्या मदमेला
(याप्रमाणें बहीण कासईला, भाऊचांदाला व भावजय हौसाईला अशा पांच ओव्या जैता गाते व गाणें वाढवलें जातें)

(महार स्त्री—सातारा जिल्हा)

शावूच्या किंवा सासू सुनांच्या गाण्यांत घटनांचा गोंधळ पुष्कळच झालेला आहे. सासू सुनांचें भांडण झालें म्हणून सासू नागाला मारते व माशाची भाजी म्हणून सुनेला खायला घालते. तिचें प्रेत पुरून टाकते. नवऱ्याला व आईला कुणालाच पत्ता नसतो. सासू सांगते माहेरीं गेली असेल. शेजाऱ्याला थाप देते बाळंतीण आहे. नवरा पण सासुरवाडीला अशीच थाप देतो, त्यामुळें आई बाळंतविड्याच्या तयारीला लागते. पण प्रत्येक वेळीं तिला अपशकुन होतो. कुंकू सांडतें, हिरव्या बांगड्या फुटतात, इ. आईला संशय येतो शावूला दगा झाला. शावू नवऱ्याच्या स्वप्नांत जाऊन त्याला सांगते व नवरा तिचें सरण रचून तिला जाळतो. शावू बाळंतीण आहे हें नवऱ्याला कां कळूं शकत नाहीं ? नवरा आईच्या कटांत

---

१ कळणा कोंडा = धान्याचा चूर (गारबाचें अन्न). २ रात्र.

सामील नसतांनाही सासूला फसवतो कां ? इ. गोष्टी कळायला मार्ग नाहीं' शावूच्या गाण्यांत गोष्टीचा घोंटाळा असला तरी शब्दसंगत्ति व योजकता भरपूर आहे. " धुनसुन ", " दणकून " हे शब्द सार्थ वर्णन करणारे आहेत. आई कडी तोडे करायला जाते ते मोडून जातात, हिरवं पातळ घ्यायला जाते तें फाटून जातें, इ. गोष्टींचे अपशकुन गोष्टीला योजकतेचा चांगला रंग आणतात.

**( ७ ) सासू-सुनांचें गाणें—**

**शावू —**

सासू-सुनांचें भांडण
सुनबाई बसली धुनसून
सासू उठली दणकून
ठाल्यांठुल्याजी[1] येचिल्या
हिनें कांडील्या कुटील्या
हिनें दळील्या मळील्या
हिनें भाकरी रांधील्या

सासू सुनेला विष घालते--

गेली लेकाच्या नांगरीं
" लेका भाकरी कुठं ठेवूं ? "
" ठिवाया आंब्याच्या वनीं "
तिथं निघाला ढवळा नाग
तिनं मारीला मुरीला
शेल्या पदरीं बांधीला
" घ्या सूनबाई मासोळ्या "
तिनं घेतील्या रांधील्या
" या सासूजी जेवाया "
" माझं पोट वो दुखतं "
शावू बसली जेवाया
दोन गिरास[2] वो सादील
तिसरा घास वो कडू लागला
" आवो आवो सासूबाई
तिसरा घांस वो कडू लागला "
" येडी झाली काय शावुबाई ? "
तुझ्या माहेराचा माळी आला
कडू मिरच्या देऊन गेला "
चौथा घास कडू लागला
" आवो आवो जी सासुजी
चौथा घास कडू लागला "
" येडी झाली काय शावुबाई ?
तुझ्या माहेराचा तेली आला
कडू तेल देऊंन गेला "
चौथ्या पांचव्या घासाला
शावूला लटपट झाली
शावूला मूर्त येळ आली

सासू सुनेला पुरून टाकते--

सासू गेली शेजारणीजवळीं
" फडकुदळ देजा मला "
" फडकुदळ काय काम ? "

---

१ ठाळा = झाडाची लहान डहाळी. २ घांस.

" शावू माझी बाळंतीण "
फडकुरळ घेतलं
शावू गाडून टाकीलं
शावू नवऱ्याच्या स्वप्नांत जाते-
शावू सपनांत गेली
" तुझ्या आईनं घात केला
नवरा आईला विचारतो—
" साती उतरंड्या उतरीलया
साती मुखा दिसलया
एक मुख दिसत नाहीं "
आई—
" गेली असेल म्हणली माहेरा "
नवरा शावूच्या माहेरीं जातो-
घोड्यावरती स्वार झाला
चालला सासूच्या गांवाला
दुरून ओळखीलं सासूनं
" माझा जावईबोवा आला "
हातीं घेतली पाण्याची झारी
तुमचं पाणी आमच्या शिरीं
आमची शावू तुमच्या घरीं
दिला पलंग टाकुनी
दाजी निजरागती झाला
शावू सपनांत आली
" उठ र मातानं घात केला
तुझ्या बयानं घात केला "
साती उतरंड्या उतरीलया
आई—
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला ? "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
आई नातवाच्या बाळंत-
विड्याच्या तयारीला लागते—
गेली सोनाराच्या घरीं
आई—
" अर अर सोनारदादा
कडीतोडे देजा मला "
सोनार—
" कडीतोड्याचं काय काम ? "
आई—
" शावू आमची बाळंतीण "
कडीतोड मोडून गेलीं
आई—
" खरं सांगा जावईबुवा
आमच्या शावूला दगा झाला ? "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
सासू तेथून निघाली
गेली शिंप्याच्या आळीला
आई—
" अर अर शिंपीदादा
अंगड टोपडं देजा मला

हिरवं पातळ देजा मला "
हिरवं पातळ फाटून गेलं
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला घात झाला "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई?
तुमच्या शावूला लेक झाला "
सासू तेथून निघाली
गेली साथी सजणापोशीं[1]
आई—
" अर अर सातीसजणा
कुकुम चिठी देजा मला "
शिपी—
" कुंकम चिठीचं काय काम?"
आई—
" आमची शावू बाळंतीण "
कुंकुमचिठी सांडून गेली
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला? "
जावई—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
आई तेथून निघाली
गेली कासाऱ्याच्या घरीं
" अर अर कासारदादा
हिरवा चुडा देजा मला "
कासार--
"हिरव्या चुड्याचं काय काम?"
आई--
" शावू आमची बाळंतीण "
हिरवा चुडा फुटून गेला
आई--
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला ? "
नवरा--
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
माता तेथून निघाली
गेली बुरूड[2] आळीला
आई--
" अर अर बुरूडदादा
येळू कळक देजा मला "
बुरूड--
" येळू कळक काय काम ? "
आई--
" शावू आमची बाळंतीण "
येळू कळक मोडून गेला
" खरं सांगा जावईबोवा
माझ्या शावूला दगा झाला ? "
दाजी तेथून निघाला
गेला मरण पुवीला[3]

१ साथी सजण = मित्र. २ बांबू. ३ स्मशानभूमी.

सरण शावूचं रचीलं
शावू सरणांत घातली
खबर बयाला[1] कळाली
बया धावत पळत
गेली सरणा वो जवळीं
आई--
" आवो आवो जावईबोवा
सरण कुणाचं जळतं ? "
नवरा " सरण शावूचं जळतं "
पांच येढं[2] वो घातील
आईनं उडी टाकीली

( मराठा स्त्री–पुणें जिल्हा )

# पौराणिक कथा-गीतें

शिवपार्वतीचा सोंगट्यांचा खेळ हा पुराणांतील एक लोकप्रिय झालेला विषय आहे. शंकर डाव हरतो आणि नारद कळ फिरवतो. बैरागी होऊन शंकर कैलास पर्वतावर धुनी घालून बसतो. पार्वती भिल्लिणीचा वेष घेऊन त्याच्यावर मोहिनी घालून त्याला जिंकते.

शंकरपार्वतीच्या पटावरील खेळांत हत्तीघोड्याऐवजी नंदी आहे. पार्वतीनें घेतलेल्या भिल्लिणीच्या वेषाचं वर्णन यथार्थ आहे. भिल्लिणीचं रूप पाहून चंद्रसूर्य देखील लपून बसतात. शंकरपार्वतीच्या स्वभावचित्रणांत पुरूष व स्त्रीच्या भावनांतील फरक चित्रित केला आहे. भिल्लिणीची मोहिनी पडतांच माझें मागें पुढें कोणी नाहीं, आपण गोसावी होबूं म्हणून शंकर तिच्या नादी लागतो तर पार्वती त्याला पार्वतीसारख्याच रत्नाची आठवण करून देते.

## (८) शिवपार्वतीचा डाव

सारंग पाट[3] डोंगरावरीं । तेथें खेळे भीमाशंकरीं ।
तिथं येवश्या[4] आल्या सत्त्वरी । कळ रचिलावी फारी ।
पारवती म्हणे शिवा । डाव पंजेचा मांडावा ।

---

१ बया = आई. २ प्रदक्षिणा. ३ सारीपाट. ४ वेश्या.

डाव पहिला गीरजेचा । नंदी हीराऊनी घेतला ।
सारंगपाट खेळली गिरजा । जिंतिलाचि शंभु राजा ।
धरी शंकराच्या हाताला । जावा म्हणती वनवासाला ।
शंकर क्रुद्धांनं दाटला । शंकर नीघून चालला ।
मार्गी नारद भेटला । हकांगत नारदाला ।
सारंगपाट खेळली गिरजा । जिंतिलाचि संभु राजा ।
मला म्हणती वनवासाला जावा । नारद बोल वचनीं ।
आग लागो द्या खेळाला । द्यावी सोडून या गिरजाला ।
तुम्ही जावं पाशी वनाला । धुनी घालुनी बसावा ।
बारा न बारा वर्सं झालीं । आठवण झाली गिरजाला ।
आग लागो या खेळाला । धनी कैलासाला गेला ।
कुणी येवशीन फितवुनी नेला । गिरीकंदरीं जाऊन बसला ।
मन्नाचा धट केला[२] । बेस[३] भिल्लिणीचा घेतला ।
चोळी उरफटी अंगाला । बाणाचा भाता पाठीला ।
हातीं तीरकमठा घेतला । चुन्याची टिकली गालाला ।
निघाली शोधावयाला । रणवन शोधून जीव दमला ।
हिमंचाल पारवताला । गेली त्याच वनाला ।
शंकर पाहिले दूरचे दूर । भिलणीचं हरसलं मन ।
तिन शंकर देखला । धुनी घालून बैसला ।
गेली शंकराजवळीं । तिनं गायन मांडिलं ।
तिचं मंजुळ ऐकून शानी । नेत्र उघडिलं शिवानीं ।
शिव पाही नेत्र उघडून । भिलणीचं चांगुलपणं[४] ।
शंकराचें हरपलें मन । करी भिलणीशीं भाषण ।
तूं हाईस कूणाची कोण ! वन्नाची भिल्लीण अज्ञान ।
मी आलें तुमच्या कारण । शंकराचें हरसलें मन ।
मांग म्होर नाहीं कोण । आपण होऊं ग गोसावी

---

१ क्रोध. २ मन खंबीर केलें. ३ वेष. ४ सौंदर्याला. "चांगुलपण" हा शब्द नेहमीं वापरला जातो.

शिवशंकर चैतान झाला । हात भिलणीवर टाकला ।
सोड सोड झिंझाडा दिला । भिल्ल हायत साठ वनाला ।
मारत्याल आपल्या दोघाला । हातांत घालून हात ।
भिल्लीण करी भाषण । वाईट तुमचे गुण ।
पारवतीसारखें रत्न । तुम्ही आलेत टाकूनशान ।
दोघांचा मनोरथ पुरला । वेस भिल्लणीचा टाकला ।
पारवती उभी शिवाला । निघून गेले कैलासाला ।

(चांभार स्त्री-पुणें जिल्हा)

"गंधारीचा वसा" हें गाणें महाभारतांतील कौरव पांडवांच्या भाऊबंदकीमुळें कुंती व गांधारी या जावाजावांत आलेल्या वितुष्टावर आधारलेलें आहे. "मानसगीत सरोवर" या पुस्तकांत श्रीकृष्णाबाई गाडगीळ या कवियित्रीनें या प्रसंगावर कथागीत रचलेलें आढळतें. सुखप्राप्ति होण्याकरतां कृष्ण कुंतीला गजगौरीव्रत करण्यास सांगतो. हस्तनक्षत्राच्या प्रारंभीं आश्विन महिन्यांत मातीचा मोठा हत्ती करण्यास सांगतो व सोळा दिवस त्याची पूजा करावयाची असें सांगतो. गांधारी तें ऐकते व तीच आपल्या शंभर मुलांकडून माती आणवून हत्ती करते व त्यावर बसून वाजतगाजत जाते व वाणें देते. कुंती कष्टी होते. आपल्याला हें कसें जमणार ? पण तिच्या कष्टाचें कारण जाणून अर्जुन व भीम इंद्राकडे जावून प्रत्यक्ष इंद्राचा ऐरावत मागून आणतात.

अशिक्षित स्त्रियांनीं हें गीत रचतांना त्यांत अतिरंजितता आणलीच आहे. गांधारीला कुंतीचा अपमान करावयाचा असतो म्हणून ती डाव्या पायाच्या अंगठ्यानें तिच्या दरवाजाला कुंकू लावते.

## (९) गंधारीचा वसा

कळ नारदाची खोटी[1] । तीन ताळाच्या[2] तळवटीं[3] ।
सोन्याची बिघडली भटी । राजअंतरीं पडल्या तुटी ।

---

१ उत्तान. २ त्रिताळ = स्वर्ग, पृथ्वी व पाताळ. ३ खालच्या भागांत.

कस्तुरींत पडली हिंगाची चिठी। वडील गंधारी धाकली कुंती।
म्होरं लागलं अस्तनापूर। तिथं कांहीं कैराव चतुर।
तिथं नांद कैराव चतुर। बंधु एकागळ शंभर।
दुष्ट या शंभराची नदर। त्यानीं काय बसून केला विचार।
नाहीं पाहिलं दूरवरी। आतां गेली वोसून गंधारी।
मर्तकीचा[१] बनाविला हत्ती। त्याला काय बनवलं सुती।
रंग दिला भवयागती। जशीं काय चित्रं काढलीं भिंतीं।
लंबी सोंड त्याला शोभती। गळयाघाट सर दोहेरी।
आतां गेली वौसून गंधारी। हत्तीवर घातली अंबारी।
अंबारीला खांब सोनेरी। सोन्याच्या टिका चमकती वरी
गंधारी बसुनी हौद्यांत। वानं[२] देती नगरनारीला।
जाती कुंतीच्या वाड्याला। डाव्या पायाच्या अंगठ्यानं[३]।
तिनं दरवाजा कुंकु लाविलं। शेजेच उसनं सवाल देणं[४]।
नाहीं दिला तिच्या प्रभु झाला ऊन।
वंसा घ्या तीळगुळ। वसा काय पुसुन भातली कळ।
कळ उत्पन्न केली खरी। आतां गेली वौसून ही गंधारी।
कुंती बोल धाव श्रीहरी। आतां गेली वौसून गंधारी।
भिवबा बाहेरूनी आला। माता कां तुझा चंद्र कोमेला।
माता भिवबाला बोलती। आग लागो तुझ्या चंद्राला।
आतां गेली वौसून गंधारी मला।
भीम म्हणे झाली शिमो[५]। तिच्यावरून हत्ती आणीन मी दिमो[६]।
भीम गेले जमुनास्थळीं। तिथं काय जाऊन डँगरी[७] ढासळली।
बंद झाली कैराव आळी। वाट मिळेना झाली हरळी[८]।
चिकलाच बनाविल गोळं। चिकलाची गोष्ट नाहीं बरी।

---

१ माती. २ वाण. ३ अपशकून किंवा अपमान करण्याकरता डाव्या पायाच्या अंगठ्यानें कुंकू लावते. ४ शेजारणीचें उसनेंदेखील परत करावयाचें असतें. ५ सीमा = हद्द झाली. ६ डीभ = ठमकारा. ७ मोठ्या आवाजांत. ८ हरळ = मोठा चर.

**आतां गेली वौसुन गंधारी।**
**सडसुध[1] बनाचा बनाविला। भीम इंगुन[2] वरती गेला।**
**इंद्रजिताला रामराम केला। इंद्र थरथरा कापला।**
**भीम कांहो येणं केलं। हत्तीकारण येणं केल।**
**हत्ती डांबेशीं बांधला। हत्ती[3] दुरून दाविला।**
**त्यांनीं धरून आणिला। साज मारीला बगलेला।**
**हत्ती डोईवरी घेतला। मेघ होऊनी वरनं आला।**
**कांचबंदी[4] अंगणांमधीं। मातानं आटा केला।**
**साजासकट हातीं झेलला।**
**भीमा म्हणे झाली शिमा। माता कसा ग झेलीला**
**माता म्हणे भीमायाला। नऊ महिने वागवीला।**
**पांच ज्योतीच्या पंचोत्रीनं[5]। मातेन भीमाला ओवाळला।**
**हत्तीवर घातली अंबरी। अंबारीला खांब सोनेरी।**
**सोन्याच्या कडा वरी।**
**कुंती बसून हौद्यांत। वाण काय देती नगरनारीला।**
**वाण देती नगरनारीला। जाती गांधारीच्या वाड्याला।**
**डाव्या पायाच्या अंगुठ्यानं। तिनं दरवाजा कुंकू लाविलं।**
**शेजेचं उसनं सवाई देणं। नाहीं दिला तेच्या प्रभु झाला ऊन।**
**वसा घ्या तीळगुळ। वसा काय पुसून मातली कळ।**
**कळ उत्पन्न झाली खरी। आतां गेली वौसून ही गंधारी।**

(चांभार स्त्री—पुणें जिल्हा)

श्रावणाची कथा खालील गाण्यांत आहे. आईबापांना काशीयात्रा घड-विण्यासाठीं कावडींतून पाणी नेणारा श्रावण झारी पाण्यांत बुडवीत असतांना दशरथाच्या बाणानें मृत्यु पावतो व तें समजतांच आंधळे आईबाप पण आत्महत्या करून धेतात.

---

१ सडा = नाडा. २ चढून. ३ इंद्राचा ऐरावत. ४ कांचेचे तुकडे बसाविलेली जमीन. ५ पंचारती.

श्रावणाच्या कथेंतील शोकरस साध्याच पण यथार्थ भाषेंत वर्णन केला आहे. आईबापांना कावडींत घालून श्रावण निघाला, तों वाटेंत पुढील संकटाची ग्वाही देणारे अपशकून घडले. मांजर आडवें गेलें. जळणाच्या मोळया वाटेंत भेटल्या, सापाचं वेटोळ वाटेंत लागलं; राक्षसिणी पीठ कांडीत होत्या. श्रावण पाणी भरायला जातो तेव्हां परत वाट सांपडावी म्हणून खुणा करीत, धोंड्याच्या लगोऱ्या रचीत, गवताच्या विटी वळीत जातो. दशरथ राजा त्याच खुणांनीं बरोबर वाट शोधतो पण प्रत्येक वेळीं श्रावणाची आठवण होऊन रडतो हें कल्पना चित्र शोकरसाचें साधें पण सुंदर चित्र आहे. प्रत्येक गाण्यांत मानव्याचा आलेप आहे. सून सासूचें बरें कधीं चिंतणार नाहीं ही प्रथा लक्षांत घेऊनच श्रावण बायकोला आई-वडिलांना पाणी तापवायला वगैरे सांगतो तेव्हां ही सुनबाई सासुसासऱ्यांना नदींत बुडवा म्हणून सांगते.

## (१०) श्रावणाची कथा

वसुदेव पायानं पांगळा ।
रुपीण[1] डोळ्यानं आंधळी ।
अर तूं सरावण्या[2] बाळा ।
आम्हाला काशीला न्यावं ।
सरावण तेथून निघाला ।
गेला सुताराच्या वाड्या ।

श्रावण—

" अर तूं सुतार मैतर ।
माझा मैतार होशील ।
कावड करून देशील ।
आईबाप नेयाचे काशीला । "
कावड करून बा दिली ।
कावड घेतली खांद्यावरी ।
आला आपल्या वाड्याला ।

श्रावण—

" अग तूं सावित्री अस्तुरी ।
कर ग बुंती[3] न भाकरी ।
माता न्हाऊन घालावी ।
पित्याला अंघुळ घालावी ।
आईबाप न्यायचे काशीला । "
सावित्री कायच बोलली ।

सावित्री—

" दोहींची मोटली बांधावी ।
नेऊन नदीला सोडावी । "
सरावण काय च बोलला ।

---

१ रुक्मिणी. २ श्रावण. ३ कालवलेला दहीभात.

श्रावण—

" अग अग तूं पापिणी ।
होशील वनीची वाघिणी ।
होशील टेकीची[1] बाभळ । "
पेटीवल्या कातीव चुली ।
माता न्हाऊं जी घातली ।
पित्या अंघुळ घातली ।
सरावणानं अंघुळ अष्टुण[2] केलं ।
सरावण भोजन जेवला ।
माता जेवूं जी घातली ।
पित्याला जेवूं जी घातला ।
दोघं कावडींत बसवली ।
घेतली चवरंगी झारी ।
कावड घेतली खांद्यावरी ।
निघाला वाड्याच्या बाहेरी ।
सरावण काय तो बोलला ।

श्रावण—

" अग तूं रुपिणी ग माता ।
मला मोठा सकुन[3] झाला ।
आडवं मांजर ची गेलं । "
तेथून म्होरच निघाला ।
आडव्या जळणाच्या मोळ्या ।

श्रावण—

" अर तूं वसुदेव पित्या ।
मला मोठा सकुन झाला ।
आडव्या जळणाच्या मोळ्या ।"
निघाला येशीच्या मारगीं ।
एक वनं वलांडिलं ।
दुसऱ्या वना सापासर्पाचं वेटोळं
तेबी बन वलांडिलं ।
तिसरं वन बा दारुण
वाघ डरक्या फोडीत ।
तेबी वन वलांडिलं ।
चवथं वन बा दारुण ।
राक्षिणी[4] पीठ कांडीत्या ।
तेबी वन वलांडिलं ।
गेला पांचव्या वनाला ।
माता कायच बोलली ।

माता—

" आम्हाला पाणी तूं पाजव । "
तिथं एक इरक्ष्याचं[5] झाड ।
कावड त्याला अडकीविली ।

श्रावण पाणी आणण्यास जातो—

घेतली चवरंगी झारी ।
निघाला तळ्याच्या मारगी ।
ठाकं[6] झाडाला घालतो ।
खुणा वाटनी करीतो ।
खळोखळा जी रडतो ।
लगुरी धोंड्याच्या रचीतो ।
खुणा वाटेनीं करतो ।
खळुखळा जी रडतो ।
विटी गवताच्या वळीतो ।
गेला तळ्याच्या पाण्याला ।

---

१ टेकडीवरची. २ अष्टांग स्नान. ३ अपशकुन. ४ राक्षसिणी. ५ वृक्ष. ६ ठोके.

**दशरथाच्या बाणानें श्रावणाचा मृत्यु—**

झारी त्यानं बुडविली ।
झारी बुडबुडा जी वाजली ।
दशरथाच्या कानीं आवाज गेला ।
त्या बाणाई[1] सोडीला ।
सरावणाच्या उरीं वो लागला ।
सरावण 'राम राम' बोलला ।
दशरथ काय च बोलला ।
" ईकतं[2] मनुष्य वा गेलं ।
रामराम कोण च बोललं । "
जवळ जाऊन पाहूं लागला—
" अर देवा सरावण भाचा म्यां मारीला । "
बाण काढाया लागला ।
सरावण काय च बोलला ।
" बाण माझा काढूं नका ।
तिथं एक ईरक्ष्याचं झाड ।
तिथ माझा मायबाप ।
त्याला पाणी जी पाजावं ।
मग माझा बाण काढावा । "
दशरथ पाणी नेतो—
घेतली चौरंगी झारी ।
निघाला कावडीच्या सुधी ।
डोकं झाडाचं बघीतो ।
खळोखळां तो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
विटी गवताच्या बघतो !
खळोखळा वो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
लगुरी धोंड्याच्या बघतो ।
खळोखळा वो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
आला कावडी जवळीं ।
मातेच्या तोंडा झारी लावीतो ।
कोण आहे म्हणून बोलूं लागली
दशरथ रडूं वा लागला ।
" काय सांगू बाई तुला ।
सरावण भाचा म्यां मारिला ।
कुंकू लेकीचं पुसलं । "

मग आई बाप पाणी पिईनात
आईबाप दोघेही स्वतःला मारून घेतात.

कावड त्यानं उचलली ।
नेली तळ्याच्या पाऊला[3] ।
काढला सरावण्याचा बाण ।
माईनं मारून घेतला ।
बापानं मारून घेतला ।
तिघेची तिघे मरण पावले ।
तोडले चंदन हे वेल ।

---

१. बाण ( गाण्यांत जमण्याकरतां ई जोडली ) २. इतके ३. कांठाला.

त्याला दिले आगीन वाट । "सरावण भाचा म्यां मारीला।
दशरथ रडूं वो लागला । कुकू लेकीचं पुसलं। "

सखूबाईचें गाणें हें अधिकच गद्यात्मक आहे. पाण्याला गेलेली सखु देवाच्या ध्यानानें बुवाच्या बरोबर पंढरीला जाते. सासू व पति तिला हाणून मारून आणवतात व कोठडींत बांधून ठेवतात. सखु भगवंताचें ध्यान करते. रात्रीं देव येतो. कुलुप कासरें गळून पडतात. देव ते स्वतःस बांधून घेतो व सखु पंढरपूरला देवापाशीं जाऊन आपला प्राण सोडते. पंढरपूर कष्टसागरांत बुडून जातें. म्हणून रुक्मिणी अमृत शिंपून सखूला जिवंत करते व तिची घरीं चोळीपातळ देऊन बोळवण करते. सासूसासरा, पति तिला धन्य मानतात.

## (११) सखूबाईचें गाणें

आकेडमासीं[२] एकादशी बुवा चालले पंढरीशीं ।
ब्राह्मणाची सखुबाई गेली होती पाण्याशीं ।
त्या पोनंदी[३] बुवांनीं पुंगीचा नाद केला ।
सखुबाईला ध्यानं लाविलं देवाचं गंगेवरी ।
घागर ठेवूनी सखु निघाली पंढरीशीं ।
सखुबाईच्या सोबतिणी घरीं आल्या सांगत सासूशीं ।
सून सखुबाई तुमची गेली पंढरीशीं ।
सखुबाईच्या सासुला राग आला जाऊनी सांगती पुत्राशीं ।
हातांत काठी लागे पाठीं सखु अडविली रस्त्याशीं ।
हाणून मारून सखु आणली घराशीं ।
दोर लाविला खोलीमधीं कोंडून टाकली ।
सखुला बांधूनीं लावली कुलपी महामोरी[४] ।
अरे भगवंता कमळीकांता दिवस होता निघून गेला ।

---

१. श्रावण हा दशरथाचा भाचा होता. बहिणाच्या मुलाला भावाची मुलगी देण्याची प्रथा महार, मराठा वर्गांत सर्रास आहे. २ आषाढ महिन्यांतील. ३ पाणोठ्यावर. ४ मोठी.

रात कशी निघून जाईल तुझे पाय केव्हां भेटत्याल ।
देवाला संकट पडलं देव आल्यात धांवून ।
राहिले सखुच्या समोर उभे ।
कासर पडलं गळून कुलूप पडलं गळून । घेतलें देवानं बांधुन।
जा म्हणाला आतां पंढरीशीं ।
दुपारचं सोवळं भोजन झालं । सासू हाक मारी स्वैपाकाशीं ।
शेजारी सांग सखु तुमची गेली पंढरीशीं ।
जाऊन पांच दक्षिणा घातल्या गरुडपारावरी उभी राहिली ।
ठेवलें पायावरी डोकं बघता बघता प्राण सोडला ।
ब्राह्मणाची सखुबाई शिव[1] झाली पंढरीशीं ।
आखडमासीं एकादशी बुवा चालले कऱ्हाडाशीं ।
सखुबाईच्या गांवची माणसें सांगत गेलीं सासूसासऱ्याशीं ।
सून सखुबाई तुमची झाली शिव पंढरीशीं ।
चंदन बेल गोळा केलं सखुबाईला अग्नि दिली ! मग निघुन घरीं गेली ।
रुक्मिणीनं हुबहुबी[2] पत्र पाठविलं विठ्ठलाला ।
भयाण दिस पंढरीं साधुसंत कष्टी दिसती ।
विठ्ठलानं पत्र पाठविलं रुक्मिणीशीं ।
जाऊन बस गरुडावरी कुपी भरून अमृत घे । जाऊन शिंपड सखुवरी ।
सखुबाई उठून बसली । चोळी पातळ बोळवण केलं रुक्मिणीनं
सखु आली शिवपाशी देव भेटले पंढरीशीं ।
सखु आली घरासी सासूसासरा बोळवण करतो ।
धन्य धन्य सखु सून तूं भाग्याची खरी ।
सखु सखु म्हणून आठवूं कुठवरी ।

( महार स्त्री–सातारा जिल्हा )

---

१ पवित्र. २ हुबेहुब, इत्थंभुत.

## सीता

" सीता जोगियाची राणी " या गाण्यांत रावण सीतेला बाटवण्याचा प्रयत्न करतो हा रामायणांतील मूळ कथाभाग घेतलेला आहे. पण त्याला ऐतिहासिक पार्श्वभूमींतून बाजूला काढून गाणाऱ्या स्त्रीनें आपल्या कौटुंबिक कल्पनांच्या कोंदणांत बसविल्यामुळें त्याच गाण्यांत परस्पर विसंगत गोष्टी कशा आल्या आहेत पहा. रामायणांत राम सीता वनवासांत असतांना रावण येतो तेव्हां " राम गेलेत वंजाया, लक्ष्मण गेलेत पारधीला " हें त्याला धरून होऊं शकेल. पण तें ऐतिहासिक सत्याच्या चौकटींतून बाहेर घरगुती वातावरणांत आणल्यामुळें दशरथ सासराही त्यावेळीं पारावर बसला होता व कैकयी सासू ओसरीवर बसली होती. या सगळ्या परिस्थितीला विसंगत असें सीतेचें वर्णन आहे. कारण ती पीतांबर, जरीची चोळी, मोत्याचे दागिने यांनी सालंकृत झालेली दाखवली आहे. सीतेची इगडी नणंदही कल्पनेनें निर्माण झाली आहे व तीच सीतेच्या चहाड्या करते असा नेहमीचा नणंदभावजयीच्या मत्सराचा विषय त्यांत आणला आहे.

### (१२) सीता जोगियाची राणी

जटाधारी जी गोसावी । यांनीं जटा वाढवील्या ।
यांनीं नखं वाढवीलीं । काखेंत झोळी जी घेतली ।
हातीं भोपळं घेतील । अंगीं विभूत चर्चिलं ।
निघाला उधंन्या[1] नगराला । बिजली[2] खेळत्या बाळाला ।
तो विचारतो—
सीतेचा वाडा दावून द्या ।
बाळ उत्तर देतो—
कांचबंदी[3] ज्या अंगण । दारीं धणीयाचं मेढं[4] । तोही सीतेचा वाडा । गेला सीतेच्या वाड्याला । आलख म्हणून बोलला ।
सीता म्हणते—
राम गेलेत वंजाया । लक्ष्मण गेलेत पारधीला ।

---

१. अयोध्या. २. बिजलीचा खेळ खेळणाऱ्या ३. कांचेच्या तुकड्यानी केलेले ४. खांब.

**दशरथ सासरा पारावरीं । केगई सासू ओसरीवरीं[1] ।**
**इगडी[2] गेलीया खेळाया । सीता बसली न्हायाला ।**
**गोसावी म्हणतो—**
**दारीं जटा मी तोडीन । दारीं नखं मी काढीन ।**
**दारीं भोपळा फोडीन । दारीं झोळीजी फाडीन ।**
**तुझ्या श्रीरामाचं सत्त्व घेऊनी जाईन ।**
**सीता न्हाऊनी ऊठली । नेसली पीवळं पितांबर ।**
**ल्याली जरभर चोळी । अंग भरलं मोतीयानं ।**
**निडाळ[3] भरलं कुंकवानं । नेत्रं भरलीं काजळानं ।**
**मुख भरलं तांबुळानं । लावली माळीयाला शिडी ।**
**काढलं चौरंगी सुप । गेली पांच उतरंडी ।**
**साळी डाळी जी काढिल्या । नेऊन योग्याला वाढल्या ।**
**इगड्या नणंदानीं देखील्या । राम आला वंजवुनी ।**
**राम म्हणतो—**
**अग तू सीता सुंदरी । घेग झारी देग पाणी । इगडी बोलती झाली । नको सीताचं पाणी । सीता जोगियाची राणी ।**
**लक्ष्मण आलेत पारधीहुनी ।**
**लक्ष्मण म्हणतो—**
**अग तूं सीता सुंदरी । घेग झारी देग पाणी ।**

याप्रमाणें राम, लक्ष्मण, दशरथ सासरा, केगई सासू हे सर्व घालून गाणें संपवतात.

"सीता रड खळुखळा" या गाण्यांत रामायणाच्या नंतरच्या पुराण-कथेंतून झालेल्या रुपांतराचा आधार आहे. सीता अपवित्र झाली असें रामाला समजतांच राम लक्ष्मणाला आज्ञा करतो कीं सीतेचा वध करावा. लक्ष्मण तिला माहेरीं म्हणून नेतो. पण सीता ओळखते कीं ही वाट माहेरची नाहीं. सर्व फळांच्या झाडांचीं नांवें घालून गाणें वाढवलें आहे.

---

1 ओसरीवर. २ नणंद. ३ कपाळ.

## (१३) सीता रड खळूखळा

सात रंगांचा पाचोळा । रामाजा शालजोडा ।
सीता रड खळुखळा ।
अर तू लक्ष्मुमनदीरा ।
मला नेता कुणीकडे ।
तुला नेतो माहेराला ।
माझ्या माहेरच्या वाट । नारळी बन बाई दाट ।
आला रामाचा दल । तोडील नारळ बन ।।

("नारळी" या ठिकाणीं इतर फळांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

**कृष्ण:**––कृष्ण हा पुराणाचा जसा एक लोकप्रिय विषय तसाच स्त्रियांच्या लोकवाङ्मयाचाही झालेला आहे. महाभारतांतील कृष्णाच्या पराक्रमाच्या कथांपेक्षांहि पुढल्या पुराणांतून वर्णिलेल्या कृष्णलीला हाच लोकांचा अधिक आवडता विषय झालेला आहे. कृष्ण-गोपींच्या रासक्रीडा हाहि अनेक नृत्यगीतांचा विषय झालेला आपण पहातोंच.

कृष्णजन्माच्या कथेला थोडेसें आपल्या कल्पनाचें अविष्टण देऊन खालील गाणें रचलें आहे. नागपंचमीच्या फेरावरच हें सर्व लांबलचक कथा-गीत गाईलें जातें. कंस जे निरनिराळे डाव कृष्णाला मारण्याकरतां रचतो त्यांत शूर्पणखेला स्तनांत विष भरून कृष्णाला पाजायला पाठवतो, किंवा कृष्णच वैराळाचें रूप घेऊन बांगड्या भरावयास कंसाच्या वाड्यांत जातो हा कथाभाग नंतरच्या पुराणांतून आलेला कपोलकल्पित असा आहे.

पुराणांतून रचलेल्या कथांतून कृष्णाच्या खास आवडत्या अशा कांहीं गवळणी होत्या. त्यांतील एक राई होती. दुसरी चंद्रावळ होती. या दोघींचे-वरून अनेक गाणीं रचलेलीं आढळतात चंद्रावळीचीं गाणीं हीं तर नाविन्यपूर्ण व शृंगाररसानें परिपूर्ण आहेत. चंद्रावळीची गोष्ट खालील गाण्यांतून विस्तृतपणें दिली आहे. ती अशी–राई व चंद्रावळ या दोघी बहिणी होत्या. राईचें लग्न कृष्णाशीं झालें होतें व चंद्रावळीचें एका गवळ्याशीं. चंद्रावळ मथुरेच्या बाजाराला दही दूध विकावें व येतांना

राईला भेटून यावें असा विचार करते. सासू तिला सांगते, मथुरेचा कृष्ण हा परस्त्रीच्या बाबत आखाळी आहे पण ती न ऐकतां जाते. बरोबर पुष्कळ मैत्रिणी घेते. वेशीराख्या कृष्णाला बातमी पोंचवतो. गवळण मोठी झाक आली. कृष्ण अशीलदान घेऊन यायला सांगतो तो मागायला जातो तेव्हां चंद्रावळीच्या सांगण्याप्रमाणें सर्व गौळणी त्याची शेंडी उपटतात, काठी पळवतात. वेशीराख्या तक्रार करतो. कृष्ण स्वतः वेशीराख्या म्हणून जातो. चंद्रावळ आधींच रागावलेली असल्यानें राईला न भेटतां तशीच जायला निघते. कृष्ण वेशीचें दार उघडतांना तिला राईला भेटायचा आग्रह करतो. पण ती म्हणते " माझा गौळी लई खट " कृष्ण त्या गवळ्याची चेष्टा करतो, " शिळं ताक खायाचा म्हशीमागं जायाचा. " चंद्रावळ न ऐकतां निघून जाते. मग कृष्ण स्वतःच राईजवळ तिचा सर्व वेष व अलंकार मागतो; " जातो गोकुळीं नाचायला " म्हणून थाप देतो. राईच्या वेषांतील कृष्ण चंद्रावळीला भेटायला जातो. पुष्कळ दिवसांनीं राई आली म्हणून चंद्रावळीचा नवरा त्या दोघी बहिणींना हितगुज बोलायला एका खोलींत झोपण्यास सांगतो. एका पलंगावर दोघी बहिणी झोपल्यावर कृष्ण आपलें स्वरूप प्रगट करतो व ती रात्र सहा महिन्यांची लांबवून चंद्रावळीचा भरपूर उपभोग घेतो. नंतर गोसाव्याचें रूप घेऊन तिला युगत लावून जातो. चंद्रावळीचा नूर कोमेजलेला दिसतो. दारीची तुळस वाळते. नवरा विचारतो, काय झालें? तिलाही कल्पना येत नाहीं. गोसाव्यानें युगत लावली एवढेंच तिला माहीत असते.

( चंद्रावळीचें दुसरें गाणें याच कथेवर आहे. त्यांत कृष्णाचें वर्णन मोठें सुंदर आहे. " चित्राव काठी ", " बेगडी वहाणा ", " काळं कांबळं " " मोवरी पावा " घेतलेली श्रीकृष्णाची मूर्ती डोळ्यासमोर त्या वर्णनानें उभी राहते. अशी वास्तवता त्यांत आहे. )

## (१४) चंद्रावळ

**अड्याल बाअी एक खडी । पड्याल बाअी एक खडी[१] ।**
**मधीं गवळ्याची वाडी । त्या गवळ्याच्या दोघी लेकी ।**

---

१ टेकडी.

राई आणि चंद्रवळी । राई दिली कान्हा घरीं ।
चंद्रावळ दिली गवळ्याघरीं । दोघींचीं लग्नें लागली
राई गेली कान्हा घरीं । चंद्रावळ गेली गवळयाघरीं

चंद्रावळ आणि सासू—

चंद्रावळ कायच बोलली । दहीदूध साठवीलं ।
तूप लोणी साठवीलं । दुधाच्या बासरी[1] भरल्या ।
जाईन मदुराच्या हाटी[2] । त्याचा विकरा करीन ।
राई बहिणीला भेटीन । तवांच[3] माघारा परतीन ।
सासू कायच बोलली ? " नको ग नको चंद्रावळी ।
मदुरेचा कान्हा आखांळी[4] । नारी पुरुषाच्या भोगितो । "

सासूचें न ऐकता चंद्रावळ जाते—

चंद्रावळ ऐकनाशी झाली । दही दूध साठवीलं ।
तूप लोणी साठवीलं । दुधाच्या बासऱ्या भरील्या ।
आगल साथीशीनंदी[5] । ओढलं रेशमी पटाउ ।
घेतल्या सोनीयाच्या मेखा[6] । घेतली रेशमांचीं दावीं ।
तिनं लगडीजी[7] लादिल्या । माग साथीच्या गौळणी ।
निघाली मदुराच्या हाटा । निघाली येशीच्या वाहेर ।
लागली वनाच्या मारगी । एक वन वलांडिलं ।
दोन वनं वलांडिलीं । तीन वनं वलांडिलीं ।
चौथ्या पांचव्या वनाला । नगर दिसूं बा लागलं ।

कृष्णाच्या नगरींत—

गेली येशीच्या जवळीं । " अर तूं येशीराख्या दादा ।
" आहेस कुणाईचा कोण ? " " मी कान्हाचा नोकर । "
" तूं कुणाईची कोण ? " " मी गवळ्याची चंद्रावळ । "
उघड म्हणाली येशीची झडप । गेली मदुराच्या[8] हाटा ।

---

१ चरव्या. २ बाजाराला. ३ तेव्हांच. ४ अरांगट. ५ बरोबर नंदी घेतला. ६ शृंखला. ७ ओझीं. ८ सुंदर.

भरल्या कवलारी पेटा। चंद्रावळ निघून चालली।
तिनं लगडी उतरील्या। नंदी पागेला लाविला।
विक्रा कराया बसली।

इकडे वेशीराख्या कृष्णाला सांगतो—

" गवळण मोठी झाक आली। "

कृष्ण—

" अशीलदान[1] घेऊन याजा। "

वेझीराख्या अशिलदान मागतो—

" अग अग तू गवळणी। अशीलदान तूं देवावा। "

चंद्रावळ—

" होऊं दे दह्याचा विकरा। होऊं दे लोण्याचा विकरा
होऊं दे तुपाचा विकरा। उरूं दे बेरी[2] ना बा शेरी।
मग घालीन तुझ्या तळहातावरी। "

गवळणींना चंद्रावळ म्हणते—

" उठा साथीच्या गवळणी। द्याग तोंडीच्या तोंडी।
उपटा माथीयाची शेंडी। " धावल्या साथीच्या गवळणी।
दिली तोंडीयाच्या तोंडी। उपटली माथीयाची शेंडी।

वेशीराख्याची तक्रार—

गेला कान्हाच्या जवळीं। " आहो आहो तुम्ही कान्हा।
नको तुमची चाकरी। नको तुमची भाकरी।
उठल्या साथीच्या गवळणी। दिलें तोंडीयाच्या तोंडी।
उपटली माथीयाची शेंडी। नग तुमची चाकरी
नग तुमची नोकरी। "

---

१ दुसऱ्या गावांत विक्री करायला आणलेल्या मालावर बसविण्यांत येणारी जकात. २ लोण्याची खालची खरवड.

कृष्ण येऊन वेशींत बसला—

हिनं दहीदूध विकरा केला। हिनं लगडीजी लादिल्या।
म्होर साथीच्या गवळणी। मागं साथीच्या गवळणी।
गेली येशीच्या जवळीं।

चंद्रावळ—

"अर तूं येशीराख्या दादा। उघडी येशीची झडप।
तूं कुणायाचा कोण?"

कृष्ण—

"मी मथुरेचा कान्हा। अग तू ग चंद्रावळी।
नको जाऊ तुझ्या गांवाला। जा तुझ्या बहिणीला भेटाया।
पाणी लोणी घालील। बुती भाकरी बांधील।
मग तुला वाट लावील।"

चंद्रावळ निघून जाते—

चंद्रावळ ऐकेनाशी झाली। "माझा गवळी लई खट[1]।"

कृष्ण—

"तुझा गवळी मला ठाव। शिळ ताक खायाचा।
म्हशीमाग जायाचा।"
चंद्रावळ ऐकनाशी झाली। निघाली येशीच्या बाहेरी।
आली आपल्या नगरीला।

कृष्ण राईचा वेष घालून जातो......

कान्हा बोलतो राईला। "अग तूं राई ग अस्तुरी।
सर्वा श्रृंगार द्यावा मला। जातो गोकुळीं नाचायाला।
बांधू भूक तान्हं लाडू। बांधू बुतीची भाकरी।"

राईचा सर्व वेष घालून आरशांत न्याहाळतो—

राईवाणी सुरत दिसूं बा लागली। निघाला येशीच्या बाहेरी।

---

१ द्वाड.

एक वन वलांडिलं । दोन वनं वलांडिलीं ।
तीन वनं वलांडिलीं । चौथ्या पांचव्या वनाला ।
आडवीं शेळयांचीं खिलारं ।

कृष्ण—

" अरं तूं शेळीराख्या दादा । शेळयांचीं खिलारं कुणाचीं ?"

खिलारी—

" चंद्रावळी या बाईचीं " ।

कृष्ण—

" चंद्रावळीला सांगा जा । राई तुझी बहीण आली । "
तेथून म्होरच निघाला । आडवीं उंटाचीं खिलारं ।
( या नंतर शेळयांऐवजीं उंट, हत्ती, गाई इ. प्राणी घालून वाढवतात.)
तेथून म्होरच निघाला । पानवठ्याला आला ।

कृष्ण—

पाणवठ्यांच्या[1] बायानो । चंद्रावळीला सांगा ।
राई तुमची बहीण आली । "

चंद्रावळीच्या घरीं—

गेला तिच्या वाड्याला । लाजून बसूं बा लागला ।
गवळी काय च बोलला । " चंद्रावळी तुझी बहीण आली ।
शेज भोज कर जाग । हितगुज बोल जाग । " सांगितलं बायकोला ।
( मग राईरूपी कृष्ण व चंद्रावळ एका पलंगावर झोपतात व कृष्ण आपलें रूप प्रगट करतो )

सहा महीन्यांची केली रात । भोग देऊन निघाला ।
निघाला गांवाच्या बाहेर । साऱ्या अंगावरले कपडे जाळून ।
गोसावी ग गेला होऊन । युगत लावाया चंद्रावळी ।
तिच्या कपाळीं हात बा लावला । गौळी काय बोलता झाला ।

---

१. पाणोठा

" चंद्रवळी तुझा नूर कां कोमलो । दारीं तुळस वाळली ।
काय झालें सांग मला । "

चंद्रावळ—

" कांहीं नाहीं झालं मला । गोसाव्यानें युगत लावली ।
त्याचा हात या लागला । "

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

कृष्ण आणि राई यांची गाणीं विपुल मिळतात. त्यांवरून राई म्हणजे राधाच असावी असें वाटतें, परंतु तिचें लग्न कृष्णाशीं झाल्याचाही उल्लेख आहे तेव्हां ती दुसरी गवळणहि असूं शकेल. परस्परांच्या खोड्या काढणें, परस्परांवर रुसणें, असा या गाण्यांतील विषय आहे. कृष्ण गाई चारायला नेतो, राई गौऱ्या वेचायला तेथेंच जाते. गौऱ्या एकावर एक रचून झाल्यावर ती कृष्णाला हात लावायला सांगते. कृष्ण आपला पावा तेथेंच विसरतो. राई तो घेऊन जाते. कृष्ण रडत आईवडिलांकडे तक्रार नेतो. अखेर राईकडे जातो. राई प्रेमालापांना सुरुवात करते व अखेर त्याला आपल्या पलंगावर बोलावून विडा देते.

## (१५) गोविंदाचा मोवरी[1] पावा

गोविंदा गेला गाई चराया । राई गेली गौऱ्या वेचाया ।
राईनी गौऱ्या वेचिल्या । राईनी तिरड्या[2] रचील्या ।
राई—" अर अर गोविंदा देवा । तिरडा उचलूं लागावा । "
गोविंदा धावत पळत । आला राईच्या जवळीं ।
तिरडा उचलुन दिला । मोवरी पावा विसरला ।
गोविंदा रडत फुंदत । गेला बापाच्या जवळीं ।
गोविंदा—" आवो आवो माझ्या बापा । माझा बापची व्हाल ।
राईच्या वाड्याला जाल । मोवरी पावा घेउनी याल । "

---

१ लवरी. मवरी. हीं शब्दांचीं रूपें झालेलीं गाण्यांतील आहेत. लवरी-लवाळयाचा बांबूचा. २ भारा.

बाप तेथुन निघाला । गेला राईच्या वाड्याला ।
बाप—" अग अग राई बाई । दे गोविंदाचा मोवरी पावा । "
राई—" तुम्ही कशाला आला मामजी ? ज्याचा त्याला धाडून द्यावा ।

मोवरी पावा घेऊन जावा ।
गोविंदा रडत फुंदत । गेला आईच्या जवळी ।

याप्रमाणें आई, भाऊ, बहीण हीं सर्व घालून गाणें वाढवलें जातें. शेवटीं गोविंदा स्वतः जातो—

गोविंदा रडत फुंदत । गेला राईच्या वाड्याला ।
उभा अंगणीं राहिला । गोविंदा बोलतो राईला ।
गोविंदा—" दे माझा मोवरी पावा । "
राई—" एवढं अंगण चढेल तवा । मग मी देईन मोवरी पावा । "
गोविंदा—" एवढं अंगण चढलों ग राई । दे माझा मोवरी पावा । "
राई—" एक पायरी चढेल तवा । मग मी देईन मोवरी पावा । "
गोविंदा—" एक पायरी चढलों ग राई । दे माझा मोवरी पावा । "

याप्रमाणें दोन पायऱ्या, तीन पायऱ्या, चार पायऱ्या, पांच पायऱ्यापर्यंत वाढवतात नंतर—

राई—" एवढी अंघोळ कराल तवा । मग मी देईन मोवरी पावा । "
गोविंदा—" एवढी आंघोळ केली राई । दे माझा मोवरी पावा । "
राई—" केशरी गंध ल्याल तवा । मग मी देईन मोवरी पावा । "
गोविंदा—" केशरी गंध ल्यालों ग राई । दे माझा मोवरी पावा "

राई—"एवढं जेवण जेवाल तवा । मग मी देईन मोवरी पावा ।"
गोविंदा—"एवढं जेवण जेवलों ग राई । दे माझा मोवरी पावा ।"
राई—"एवढा विडा खाल तवा । मग मी देईन मोवरी पावा ।"
गोविंदा—एवढा विडा खाल्ला ग राई । दे माझा मोवरी पावा ।"
राई—"एवढा पलग चढाल तवा । मग मी देईन मोवरी पावा ।"
गोविंदा—"एवढा पलंग चढलो ग राई । दे माझा मोवरी पावा ।"

(मग राई पावा देते)

कृष्णाच्या बासरीप्रमाणेंच राईचा हार ती नदीवर आंघोळीला गेली असतांना कृष्ण पळवितो त्यावर खालील गीत आहे. राई हार मागते. त्याबद्दल ती नथ अगर दुसरे दागिने द्यायला तयार होते. पण कृष्ण तिला शपथ घालतो. कृष्ण-राईच्या या प्रेम-गीतांत देखील सासू-सुनेच्या भांडणानें गाण्याची सुरुवात आहे.

## (१६) राईचा हार

सासू सुनेचं भांडण । राईनीं सारवून सुरवून ।
राईनीं धुणं गोळा केल । गेली यमुना नदीला ।
राईनी धुण जी धुतील । राईनी वाळत घातीलं ।
काढला अंगावरला अळींकार । राईनीं आंघुळ जी केली ।
नेसली पिवळं पीतांबर । घातली मद्‌मा काचोळी ।
राईनीं धुणं गोळा केलं । राईनी गाठोडं बांधीलं ।
आली आपल्या घरला । राईनी धुणंजी ठेवीलं ।

घेतलं खुंटीचं आईनं[1] । तोंड न्याहाळाया लागलं ।
सर्व शीनगार[2] आहे । गळ्यांतील हार नाहीं ।
राई धावत धावत । गेली यमुना नदीला ।
राई—" अग अग यम्नाबाई । इथं आलं होतं कोण ? "
यमुना—" आला होता गोविंदादेवा ।" राई धावत पळत ।
गेली गोविंदाजवळी ।
राई—अर अर गोविंदादेवा ।
हाराची हारकी काय ग देशी । देईन नाकांतील नथ ।
नाही नथजी लागत । राई तुमची आगत ।

( महार स्त्री—पुणें जिल्हा )

चेंडूफळीच्या गाण्यांत राई कृष्णाची चेंडूफळी पळवते म्हणून तो तक्रार करतो. तिनें चेंडूफळी दिल्यावर तो तिला खेळांत घेत नाहीं म्हणून ती तक्रार करते. मग ती त्याला अंगठी देते व दोघे खेळूं लागतात. खेळ झाल्यावर कृष्ण प्रेमांत येऊन राईला हारतुरा आणून देतो—

## (१७) कृष्णाची चेंडूफळी

काळ्या गाईचं दूध चांगलं । जेव तूं जेव कृष्ण तूं बाळ ।

( चाल )

कृष्ण निजरासा झाला । कृष्ण एकनासा झाला ।
अग गवळ्याची राई । देग कृष्णाची चेंडूफळी ।
चेंडूफळी झुगारली । जाऊन पडली कडंम[3] डहाळीं ।
चेंडूफळी उचलली । गोविंदा धावत पळत ।
आला मातेच्या महालांत । दिली राईनें चेंडूफळी ।
गेला गोविंदा खेळाया । चेंडूफळी या घेउनी ।
डाव मांडिला खेळण्याचा । राई धावत पळत ।

१ आरसा. २ शृंगार. ३ कदंब.

राई—आम्हाला घ्या हो खेळांत । गोविंदा बाळ बोलत ।
" नाहीं घेत खेळांत । " " मी नाहीं दियाची खेळूनी । "

आला बापाच्या महालाला । बापा धावत पळत ।
राई बोलती झाली या । सांगू लागली बापाला ।
बाप बोलाया लागला । " घेरे राईला खेळांत । "
" नको आमुच्या खेळांत । "

( चाल ) हातांतली अंगुठी । देत झाली गोविंदाला ।

" आतां येते मी खेळांत " । " ये ग अमुच्या खेळांत । "
दोघे लागले खेळायाला । दोघे निघाले खेळूनी ।
आले आपल्या वाड्याला । खेळ खल्लास झाला ।

( चाल ) हारतूरा आणून दिला । राईच्या हातांत ।

कृष्ण चेंडूफळीचा खेळ खेळत असतांना त्याचा चेंडू कदंबाच्या झाडावर जाऊन पडतो. कदंबाची फांदी मोडते व मोठा आवाज होतो. यशदेला बातमी जाते कीं कृष्ण बुडाला. यशदा रडते. इतर स्त्रिया तिला समजावतात कीं कृष्ण हा तिला झालेला मुलगा नव्हताच. तिनें इतकें रडूं नये. यशोदेऐवजीं मात्र गाणारी चुकून देवकीचेंच नांव घालते.

## (१८) खुळखुळ येळूंबाची जाळी

खुळखुळ येळूंबाची जाळी । कृष्ण खेळ चेंडूफळी ।
तेथून चेंडू झुगारीला । कळंबखांदीं अडकीला ।
कळंबखांदी कडाडली । बात देवंईला[1] गेली ।
कान्हा तुला झाला नाहीं । राजाविधी केला नाहीं ।
राजाविधी पवळयाचा आम्ही सुना गवळ्याच्या ।

( महार पुरुष—अहमदनगर जिल्हा )

---

१ देवकी.

" अन काय मागशी मुरारी " या गाण्यांत देवकी (यशोदेऐवजीं) नें केलेले कृष्णाचे विलक्षण लाड वर्णिले आहेत. चेंडू नदींत बुडाला म्हणून कृष्ण रडतो. देवकीला वाटतं याला कुणीं रागावलं, कीं कांटा मोडला, कीं खडा टोंचला! कुणीं कृष्णाला दुखवलं असेल त्याला ती शिक्षा करीन म्हणते. जें काय कृष्ण मागेल तें द्यायला तयार होते. मग खस्याळ कृष्णही सर्व अशक्यप्राय गोष्टी मागतो. विस्तावावाचून पोळी, आकाशींचा चांद, रांजण फोडून पाणी दे म्हणतो.

## (१९) अन काय मागशी मुरारी ?

मिळल साथीशी गोपाळ । डाव चेंडूफळीचा मांडिला ।
चेंडू बारा[1]चा उडाला । जमना बाईला बुडाला ।
हरी रडत फुंदत । आला देवईजवळीं ।
देवकी—"कुणी र डोळ्यानं दापीलं ? त्याचा डोळा मी काढीन ।
कुणी र बोटानं दापीलं ? त्याचं बोट मी मोडीन ।
कुठला कांटा र मोडला ? तिथली कुपाटी झोडीन ।
कुठला खडा र टोचला ? तिथली बिदाई[2] झाडीन ।
अन काय मागशी मुरारी ? देईन तुजला श्रीहरी "
कृष्ण—" इस्त्या[3]वाचून पोळी देग बाई मजला भाजून "
देवकी—" अन काय मागशी मुरारी ? देईन तुजला श्रीहरी ।"
कृष्ण—" आगाशीचा चांद दे बाई मजला धरूनी ।"
देवकी—" अन काय मागशी मुरारी ? देईन तुजला श्रीहरी ।"
कृष्ण—" रांजण फोडून पाणी दे बाई मजला काढूनी ।"
देवकी—" अन काय मागशी मुरारी ? देईन तुजला श्रीहरी ।"
(मराठा स्त्री—अहमदनगर जिल्हा)

कृष्ण, राई, राधा, चंद्रावळ यांचीं आणखीही गाणीं आहेत. त्यांत जास्त घरगुती वातावरण आणलेलें आहे. कृष्ण नारळीच्या बनांतून येतो

१ कुंपण. २ बिदी = गल्ली. ३ विस्तव.

तेव्हां राई संशय घेते. इतका वेळ कुठें गेला होतात. मग कृष्णही चेष्टा करतो. गौराई सवत आणली. त्याच्या डोकीचा रुमाल व हातांतील अंगठी तो धोब्याकडे व सोनाराकडे टाकून येतो. त्याबद्दलही राई संशयानें प्रश्न विचारते—

## (२०) उघड राई दरवाजा

" उघड राई दरवाजा। गवळी आला तुझा। "
" इतकं जी इतकं कुठं जी गेलेत? "
" गेलों होतों गेलों होतों नारळीच्या वनीं।
तिकुनी तिकुनी आणली गौराई सवत। "
" आणुनी आणुनी कुठं जी ठेवली? "
" ठेविली ठेविली नारळीच्या वनीं। "
" तोडावा तोडावा नारळीचा नारळ।
बोलवावा बोलवावा नगरीचा सुतार। "
" इतकंजी इतकंजी तुमी रुमाल कुठं डोईचा ठेवला? "
" धोबी माझा भैतर तेथें धुवायला टाकला। "
" हातांतील अंगठी तुम्हीं कुणाइला दिली? "
" सोनार माझा भैतर तिथं घडाया टाकली। "

दुसऱ्या गाण्यांत कृष्ण हा आपला बंधु लेखून राईला खिजवलें आहे. रात्रीचा दागिने घालून कृष्ण येतो दरवाजा उघड.

## (२१) खांद्यावरी लवरी पावा।

खांद्यावरी लवरी पावा खणुखणी गुंजा।
उघड राइ दरवाजा गौळी आला तुझा
गवळी नव्हे माझा मथुरेचा राजा।
कानांत कुडक्या बंधु माझा पति तुझा।
त्याही कुडक्याला ग सोन्याच्या तारा।
गुफिती मध्यान रात्रीं ग राजा येतो ग।

( " कानांत कुडक्या " या ठिकाणीं गळयांत हार वगैरे पुरुषांच्या दागिन्यांचीं नांवें घालून हेंच गाणें वाढवतात.)

खालील गाण्यांत राधा रुसली आहे व कृष्ण तिला समजावीत आहे, फराळाला देत आहे व दागदागिने देऊन खूष करीत आहे असें चित्र आहे.

## (२२) कर ग राधिके फराळ

**" खारिक खोबरं उंच केळं । आणिक देतो नारळ ।**
**कर ग राधिके फराळ । "**
**राधा रुसली समजना समजावितो हरी नानापरी ।**
**जाऊन राधेच्या मंदिरीं ।**
**तोडे ठेविल्यात तकत्यांतीं[1] । घालून पायाईत[2] ।**
**अन माझ्या गळयाची शपथ । खारिक खोबरं......**

( "तोडे" याऐवजीं इतर दागिन्यांचीं नांवें घालून हेंच गाणें वाढवतात.)

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

" माळ तूं गुफ मी गळयांत घालीन " गाण्यांत लहानगी चंद्रावळ मोत्यानें गुंफलेल्या सोन्याच्या सुफलीनें खेळत असते. कृष्ण तिला धरतो व मग दोघांचें द्वंद्व गीत पहा—

## (२३) माळ तूं गुंफ गळयांत मी घालीन

**सोन्याची सुपली मोत्यानं गुफली ।**
**धाकटी चंद्रावळ बाई खेळाया गुतली ।**
**खेळतामेळता गोविंदानं देखिली ।**
**" सोड सोड गोविंदा मी वैताग घेईन ।**

---

१ " तबकांत " असावें. २ पायांत.

वैताग घेईन मी मळ्यांत जाईन ।
मळ्यांत जाईन मी जाईजी होईन ।
मी जाईजी होईन तूं सुतार होशील ।
तूं सुतार होशील फुलं मी तोडीन ।
तूं फुलं जी तोडशील माळ मी गुफीन ।
माळ तूं गुफ मी गळ्यांत घालीन । ”

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

## (२४) बाजार मोठा लौकर गाठा

बाजार मोठा लौकर गाठा । मथुरेच्या हाटा तुम्ही चला निघा ग ।
खालल्या आळीच्या वरल्या आळीच्या ।
चंद्रावळीला तुम्ही हाका मारा ग ।
बाजार आला उशीर झाला । मथुरीच्या हाटा तुम्ही चला चला ग ।
बाजार भरला उशीर झाला । नवरा माझा कुठं गेला ?
आडवं होईल बाई मुरलीवाला ग । बासरीवाला ।

दरव्या की काठीं बगळा बोलतो सारंगी ।
गवळीदादा बोलूं लागला घे गोधन कीं चल घरला ।
आडवा डोंगर सासुरवाशिणीला ।
चिंता पडली रामाला चिंता पडली राघूला ।
गवळीदादा बोलूं लागला घे गोधन कीं चल घरला ।

## शंकर पार्वती

शंकर-पार्वतीवरून गाईलेलीं गाणीं थोडींच आहेत. त्यांतही भोळ्या शंकराला आणि गौराईला कौटुंबिक वातावरणांत बसविलेलीं दिसतात. शंकर गवंड्याचं काम करून कमाई करतो आणि गौराईदेखील विकायला जाते.

## (२५) दवण्याची गाडी

दवणा नव्ह बाई दवण्याची गाडी दवण्याची गाडी ।
भोळा शंकर बांधीतो माडी बांधीतो माडी ।
माडी बांधुनी कमाई केली कमाई केली ।
आमची गौराई वंजायला[1] गेली वंजायला गेली ।
वंजच बैल येत्याल डुलत येत्याल डुलत ।
जरीच रूमाल येत्याल उडवीत येत्याल उडवीत ।
सोन्याचीं कारलीं येत्याल झेलत येत्याल डोलत ।

(महार स्त्री—जिल्हा सातारा.)

दुसऱ्या गाण्यांत गौराई फळांच्या बागेंत फळें तोडत आहे व मैत्रिणींच्या ओट्या भरीत आहे असें चित्र आहे.

## (२६) गौराई

आली आली गौराई येथंच होती ।
आंब्याच्या वनीं गुतली होती ।
आंब्याचा आंबा तोडत होती ।
सयाच्या ओट्या भरीत होती ।
सयाला वाट लावीत होती ।
जा जा म्हणूनी सांगत होती ।
आली आली गौराई येथंच होती ।
केळीच्या वनीं गुतली होती ।

(याप्रमाणें आंब्याच्या ठिकाणीं केळीं, नारळ, सुपारी, पेरू अशीं इतर फळांचीं नांवें घालून हेंच गाणें वाढवतात.)

---

१ विक्री करायला.

## (२७) शंभु शिकारी

**शंभु शिकारी पार्वती माता । डाव यानं मांडीला सोंगट्याचा ।**
**डाव मांडून फासा टाकून । जितीला टाळा गोसाव्याचा ।**

## पंढरपूर

पंढरपूर हें साऱ्या महाराष्ट्रांतील वारकऱ्यांचें तीर्थाचें ठिकाण. मराठा, महार या सर्व शेतकरी वर्गांतून वारकरी पंथांतले लोक खूप आढळतात. एकादशीचे वेळीं पंढरीच्या विठोबाचें दर्शन घ्यायला टाळ कुटीत अनेक वारकऱ्यांच्या मालिका पायीं प्रवास करून जात असतात. या पंढरपुरावरून गाईलेलीं गाणीं विपुल मिळालीं तर त्यांत नवल नाहीं. पंढरपूर पाहिलं आणि विठ्ठल रखुमाईचं दर्शन घेतलं कीं सारी तहानभूक हरते असें खालील गाण्यांत स्त्रीनें म्हटलें आहे. पंढरपूरच्या सर्व देवांचीं नांवें घालून हीं गाणीं पुष्कळ लांबवतात.

## (२८) पंढरपूर म्यां पाहिलं शिखर

**पंढरपूर म्यां पाहिलं शिखर । हरली ग माझी तहानभूक ।**
**पाहिलं रुक्मिणीचं मुख । तुझ्या चरणापाशीं मन झालं माझं थिर ।**
**पंढरपूर म्यां पाहिलं शिखर । पाहिलं विठ्ठलाचं मुख ।**

(याप्रमाणें शंकर, पार्वती व पंढरपुरांत आढळणाऱ्या अनेक देवांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

एकादशीच्या वेळीं पंढरपूरला जी मोठी यात्रा भरते त्याचें थोडेसें वर्णन खालील गाण्यांत आहे.

## (२९) म्यां नामदेव देखिला नयनीं

**धन बा धन नारायण । हरि बा हरि नारायण ।**
**पाण्यांमधीं लाविल्या देवी ग गरगऱ्या फिरविल्या नारी ।**

---

१. जत्रेंतील वर्णन.

**लावून पताकाचा भार जत्रा भरली अंतनापर[1] ।**
**त्यां नामदेव देखिला नयनीं ग मन उदास निर्मळ वाणी ।**
**पाण्यामधीं लाविल्या देवी.........**

( नामदेव या ऐवजीं इतर देवांचीं नांवें घालून गाणें वाढवतात. )

पंढरपुरांतील विठ्ठल रुक्मिणी यांना कौटुंबिक घरगुती आवरणांत बसवून निरनिराळ्या कल्पनांनीं त्यांचीं चित्रें रंगविलीं जातात. विठ्ठलदेव राज्य करतां करतां माळिणीच्या मळ्यांत जातो, शेवंतीचीं रोपं आणतो या कल्पनेनें खालील गाणें रचलें आहे.

## (३०) हा हर पंढरी काय वो झाली ?

**हरि बा हरि नारायण धन बा धन नारायण ।**
**हरहर पंढरी काय वो झाली । समदी सोन्यानं मढवली ।**
**विठ्ठलदेव राज करी ।**
**राज करीता करीता । गेला माळणीच्या मळा ।**
**आणलीं शेवंतीचीं रोप ।**
**टाकिलीं वंजाऱ्याच्या घरीं । वंजारीदादा पाणी घाली ।**
**पाणी घालीता घालीता । त्याला कळया आल्या भारी ।**
**राम तोडी । लक्ष्मण दुरड्या भरी ।**
**या दुरड्याच्या काय काय परी । नाग डुलतो चाफ्यावरी ।**
**यावं हरि बसावं पलंगावरी । आबीरबुक्का झोकितो गळ्यावरी ।**
**हर हर पंढरी कायवो झाली ।**

(याच गाण्यांत शेवंतीऐवजीं तुळस, इतर फुलें व फळें यांचीं नांवें घालतात.)

पंढरपूरला विठ्ठल आणि रखुमाईचीं देवळें स्वतंत्र आहेत. पण विठ्ठलाच्या मंदिरांत रुक्मिणीला पाहिलें अशी कल्पना करून खालील गाणें रचलें आहे. विठ्ठलाबरोबर राम, मारुती यांचेही उल्लेख गाण्यांत केले आहेत.

---

१. अंत नाहीं अशी मोठी.

## (३१) हार तुरा वाहिला

**हार तुरा वाहिला। रुक्मिणीच्या महालामधीं विठ्ठलदेव पाहिला।**
**ध्यान मला रामाचं। मारुतीला पत्र आलं लंकेवरी जायाचं।**
**राम मला भेटला। आनंदाचा दिवस मला आज सखे वाटला।**

पंढरपुराबद्दल एकदां भक्ति निर्माण झाली म्हणजे आपला सखाही तेथेंच भेटतो व विहीण पण तेथलीच मिळते—

## (३२) पंढरपूरच्या शिवेवरी

**पंढरपुरच्या शिवेवरी शिवेवरी।**
**सख्या देखिला बाई ग बाई ग।**
**त्याहून करमत नाहीं ग नाहीं ग।**
**पंढरपूरच्या शिवेवरी शिवेवरी।**
**इवाईण[1] माधुरी माधुरी।**
**झोका खेळतो कृष्णनाथ दोरकंत[2]।**
**असा झोका माधुरी माधुरी।**

(महार स्त्री—सातारा जिल्हा)

विठ्ठल रुक्मिणीला मानवी कोंदणांत बसवून त्यांच्यावरून गाणीं गाईलीं जातात त्यांत खालील गाणें वैशिष्ट्यपूर्ण आहे. बालवय संपवून तारुण्यांत पदार्पण करणाऱ्या रुक्मिणीचें मानवी चित्र या गाण्यांत रेखाटलें आहे. रुक्मिणीला नहाण येतें त्या प्रसंगाचें सर्वजण कौतुक करतात. रुप्याचे खांब, सोन्याचा कळस आणि मोत्याच्या जाळ्या यांनीं मढवलेलें मखर व जरीकांठीं लुगडें, बादल्याची चोळी, कुरळ्या केंसांचा मोत्यानें भरलेला भांग, पैंजण, बोटांत जोडवीं या सर्व अलंकारांनीं युक्त आणि काजळकुंकू, गुलाल, तांबूल यांनीं रंगलेली रुक्मिणी सूर्यासमोर उभी राहिली कीं सर्वकडे लख्ख

१. विहीण. २. द्वारकेंत.

उजेड पडतो. "मानसगीत सरोवर" या पुस्तकांत कवियित्रीनें "जानकीचें न्हाण" या गाण्यांत सीतेला न्हाण आलें त्या वेळीं झालेल्या कौतुकाचें व समारंभाचें असेंच वर्णन केलें आहे. न्हाणुलीच्या ओव्याही आपल्याकडे पूर्वी गात असत. आज मात्र त्या मिळणें दुरापास्त आहे.

## (३३) रुकमिणी न्हाणुं आलं

आली पंचमी बुधवारीं । पुसा नक्सीतरावरी[१] ।
रुकमिणी न्हाणुं आलं । देवई नातु झालं[२] ।
पुज देवई आनंदाला । रुपियाच खन खांब ।
वरचा कळस सोनियाचा । आणल्या त्या गज न काठ्या ।
मोतियाच्या कोरीव जाळ्या । हेलबाळ्या[३] हेलायाच्या ।
लाजूनी रुकमिणी । उभी परस वो दारीं ।
कंबरला माचूपट्टा । चालती झरुझरा ।
नेसली जरीस्तार कांठीं । चोळी लीली[४] वो बादली ।
विंचरी त्या कुरळ क्यास[५] । नारी गुंफिताती वेणी ।
उभी सूर्या वो संमुख । पड उजेड लकोलका ।
भांग भरला मोतियानं । कानीं लीली भोकरघाट[६] ।
गळ्या दर्पण[७] पुतळ्या । मुख भरलं तांबुलानं ।
नेत्रं भरलीं काजळानं । ललाट भरलं कुंकवानं ।
दलाल[८] भरलं गुललानं । कपाळीं ग आडवी चीरी ।
नाकीं लीली वो वीसुर[९] । पाय भरलं पैंजणानं ।

---

१. नक्षत्र बघा. २. मुलीला ऋतुप्राप्ति झाली म्हणज सासूला किंवा आईला "मुका नातू झाला" असें म्हणण्याची प्रथा आहे. म्हणजे नातू होण्यास ती पात्र झाली. ३. हिलबाळया (?) हलणाऱ्या बाळ्या. ४. ल्याली. ५. केस. ६. भोकरें–झुब्याचीं कर्णभूषणें. ७. आरशाच्या. ८. कपाळ (?) ९. मोती.

**बोटं भरलीं जोडव्यानं । आली पोलार[1] वाजवीत ।**
**दिलं मखमली डेर । काय न्हाणाचं कौतिक झालं ।**
**पीटिलं लीटी ठेवून शरण[2] ।**

( मराठा स्त्री—सातारा जिल्हा )

पंढरपूरचा सोनार बोलावून रुक्मिणीला सर्व दागिने घडविण्याबद्दल खालील गाणें आहे—

## (३४) पंढरपुरचा सोनार बोलवा

**हिरामोरावैनं गांवा गेला हरी । गांवा गेलेल्याची वसली पंढरी ।**
**पंढरपुरचा सोनार बोलवा । रुक्मिणीनारीला पुतळ्या घडवा ।**
**एका पुतळीचे साडेतीनशे मोती । रायरुक्मिणीचा पांडुरंग पती ।**

( "पुतळ्या"चे जागीं "चिताग", "पैंजण", "सरडी" (सरी) इ. दागिने घालून गाणें वाढवतात.)

खालील गाण्यांत कृष्णाची मुरली ऐकून राधेची गाळण उडते व ती पंढरपुरला जाण्यास निघते अशी कल्पना आहे. विठ्ठलाबद्दलची भक्ति, काम करतांना त्याला गाणारी स्त्री आपला सखा, आपला मुऱ्हाळी, आपला मेहुणा कल्पून गाते.

## (३५) हरींनं मुरली वाजिवली हो वाजिवली

**हरीनं मुरली वाजिवली वो वाजिवली ।**
**राधा गवळण घाबरली वो घाबरली ।**
**पंढरीला जायाची वो जायाची ।**
**सांग साडी नेसायची वो नेसायची ।**
**वाळवंटीं जायाची वो जायाची ।**

---

१. पोल्हार = जोडव्यासारखा दागिना. २. या ओळीचे शब्द स्पष्ट नाहींत.

वाळवंटीं मक्का[1] की मक्का की ।
विठ्ठल आमुचा सखा की वो सखा की ।
हरीनं मुरली वाजिवली वो वाजिवली ।
राधा गवळण घाबरली वो घाबरली ।
पंढरीला जायाची वो जायाची ।
सांग साडी नेसायची वो नेसायची ।
वाळवंटीं जायाची वो जायाची ।
वाळवंटीं हराळी[2] वो हराळी ।
विठ्ठल आमुचा मुऱ्हाळी[3] वो मुऱ्हाळी ।
हरीनं मुरली वाजविली वो वाजविली ।
राधा गवळण घाबरली वो घाबरली ।
पंढरीला जायाची वो जायाची ।
सांग साडी नेसायची वो नेसायची ।
वाळवंटीं जायाची वो जायाची ।
वाळवंटीं दवूणा हो दवूणा ।
विठ्ठल आमुचा मेहुणा वो मेहुणा ।

( मराठा स्त्री—सातारा जिल्हा )

## सासर—माहेर

सासर आणि माहेर यांचेवरून गाईलेलीं खालील गाणीं मोठीं मनोरंजक आहेत. लग्नाचा अर्थ समजायला लागण्यापूर्वीच लग्न होऊन सासरीं जाणाऱ्या जुन्या काळांतील बालेला सासरीं अल्लडपणानें वावरायला मिळत नाहीं म्हणून सासरबद्दल रोष उत्पन्न व्हावा व माहेरची ओढ लागून राहावी हें स्वाभाविकच आहे. त्यांतून सासूनें सुनेचा आणि नणदेनें भावजइचा छळ करावयाचा ही रुढीची परंपराच. तेव्हां प्रसंगाप्रसंगाला

१. मका. २. हरळी–गवत. ३. मुऱ्हारी = ( मूळ हारी ) सासरी गेलेल्या मुलीला माहेरीं येण्यास मूळ किंवा बोलावणें आलेला—भाऊ.

सासरीं राहिलेल्या या मुलीला माहेरची आठवण व्हावी हा प्रत्येकीचा स्वानुभवच या गाण्यांतून रंगविलेला आहे.

**असं माहेर गोड बाई खेळाया धाडीत ।**
**असं सासर दोड बाई कोंडून मारीतं ।**

या ओळी स्त्रियांच्या गाण्यांतील अत्यंत लोकप्रिय व सर्रास झालेल्या आहेत.

खेळतां खेळतां म्हणावयाच्या गाण्यांतून कोणताही विषय शेवटीं माहेराला नेऊन स्त्रिया कसा भिडवतात तें खालील गाण्यांत चांगलें दिसून येतें. आंब्याचें झाड लावलें. त्याला आंबे आले म्हणजे लोणचें घालावें तें दिराला वाढावें आणि दीर जो आड खंदील त्यांतून निघणाऱ्या चिखलांत जातें वसवावें व त्या जात्यावर दळलेल्या गव्हाच्या शेवया गाडींत भरून ती गाडी माहेराला धाडावी इथपर्यंत गाणारी येऊन पोंचते........

## (३६) असं माहेर गोड बाई

**गांवाखालती पांढर[1] नांगरली डोंगरली ।**
**रोपं आंब्याचीं लावलीं ।**
**आंबा आलाया एक पानं मंग आला दोन पानं ।**
**मंग आला तीन पानं मंग आला चार पानं ।**
**मंग आला पांच पानं ।**
**चवथ्या पांचव्या आंब्याला फुटल्या फांद्या ।**
**मंग पाल्यानं भरला मंग मोहरानं दाटला ।**
**आंब्याला हो आंबे आले ।**

**असं आंबं गोड बाई लोणचं जी घालावं ।**
**असं लोणचं गोड बाई दीराला वाढावं ।**
**असा दीर गोड बाई आड जी खंदील ।**
**असा आड गोड बाई पाणीजी निघालं ।**

---

१. वसाहतीची पांढरी जमीन.

**असं पाणी गोड बाई चिखुल मळावा ।**
**असा चिखुल गोड बाई जातं जी टाकावें ।**
**अशी जातीं गोड बाई गहू जी वलवांवे[1] ।**
**असे गहूं गोड बाई सोजी[2] जी पाडवाव्या ।**
**अशी सोजी गोड बाई शेवाया वळाव्या ।**
**अशा शेवया गोड बाई दुरड्या भराव्या ।**
**अशा दुरड्या गोड बाई रुमालांनीं बांधाव्या ।**
**असे रुमाल गोड बाई गाडींत टाकावे ।**
**अशी गाडी गोड बाई माहेरा धाडावी ।**
**असं माहेर गोड बाई खेळाया धाडीतें ।**
**असं सासर दोंड[3] बाई कोंडून मारीतें ।**

माहेराबद्दलच्या ओलाव्याच्या भावनांमुळेंच गाण्यांतून पंढरपूर-महाराष्ट्रियांचें आवडतें तीर्थक्षेत्र–आपलें माहेर असल्याबद्दलचा उल्लेख नेहमीं येतो. माझं माहेर पंढरपुरीं आहे आणि त्या पंढरपुराचं काय साजे तर येतां जातांना खुळखुळ वाजे म्हणजे माहेरीं गेलं की पैसे खुळखुळत असतात. माहेरवाशिणीसाठीं आई, बाप, भाऊ कोडकौतुक करायला नेहमीं तयार असतात असा भावार्थ. वरच्या गाण्यांतून दिराबद्दलची कौतुकाची भावना व्यक्त झाली आहे तर या गाण्यांत दीरच भावजयीची चहाडी करतो व म्हणून सासूसासरे चाबूक मारायला उठतात असा उल्लेख आहे. पण सासूसासऱ्यांचे चाबूक मी कशाला सहन करीन ? ते दूरच्या दूरच राहतील व मी माझ्या माहेरीं पळीन असा गाणारीचा आशय—

## (३७) माझं माह्यर पंढरपुरीं

**दोन तीन बैलांच्या लागल्या झुंजा ग लागल्या झूंऽजा ।**
**तिथें सांडल्या माझ्या गुंजा ग माझ्या गूंऽजा ।**
**धाकल्या दिराला गवसल्या ग गवसऽल्या ।**
**धाकल्या दिरानें काय माझं केलं ग काय माझं केऽलं ।**

---

१. आलवावे. २. रवा. ३. द्वाड.

सासूसासऱ्याला सांगीत गेला ग सांगीत गेऽला ।
सासूसासऱ्यानं काय माझं केलं ग काय माझं केऽलं ।
दोन तीन चाबूक चमकाविलं ग चमकावीऽलं ।
दोन तीन चाबूक दुरच्या दुरीं ग दुरच्या दूऽरीं ।
माझं माहार पंढरपुरीं ग पंढरपूऽरीं ।
पंढरपुराचें काय बाय साजे ग काय बाय साऽजे ।
येता जातांना खुळखुळ वाजे ग खुळखुळ वाऽजे ।
( मराठा स्त्री—सातारा जिल्हा )

" सई सुट मामा उठ " या गाण्यांतही दीर चाबूक दाखवतो असाच उल्लेख आहे. पंढरपूर, रत्नागिरी, मुंबई या माहीत असलेल्या शहरांचा घोळ गाण्यांत केला आहे.—

## (३८) सई सुट मामा उठ

सई सुट । मामा उठ ।
मामा गेलेत तेलंगपुरीं[1] बाई तेलंग पूऽरीं ।
त्यांनीं आणल्या लाल लाल साड्या बाई लाल लाल साऽड्या ।
आम्हीं नेसुनी केलं पाणी बाई केलं पाऽणी[2] ।
तिथं होता धाकला दीर बाई धाकला दीऽर ।
एक चाबुक चमकाविलं बाई चमकावीऽलं ।
एक चाबुक दुरच्या दुरी बाई दुरच्या दूऽरीं ।
माझं माहार पंढरपुरीं बाई पंढरपूऽरीं ।
माझं आजोळ रत्नागिरी[3] बाई रत्नागीऽरी ।
रत्नागिरीच्या टाक्यावरी बाई टाक्यावऽरी ।
शाळू होळीच्या चाफ्यावरी बाई चाफ्यावऽरी ।
आनांत ग वनांत ग चाफ्याचं फूल माझ्या कानांत ग ।
लवंगा घातल्या उन्हांत ग ऐकू गेलय् मुंबईत ग ।

१. कानडी मुलखांत देवस्थान असावें. २. खराब केल्या. ३. हें 'रत्नागिरी' म्हणजे कोल्हापूरजवळील.

"सासरच्या वाट गुजुगुजु काट" या गाण्यांत सासरच्या सर्व नातलगांबद्दलचा रोप गाणारी व्यक्त करते पण पतीबद्दल मात्र त्याचें सर्व ऐकायला व त्याच्याबरोबर जायला तयार होते. सासू, सासरा, दीर हे तोडे, बांगड्या, साखळ्या इ. दागिने घेऊन येतात तरी सूनबाई चारी दरवाजे लावायला व त्यांचे अंगावर झामरा कुत्रा सोडायला लागते पण पति मात्र नुसती भाकरी घेऊन येतो तरी दरवाजे उघडायला व झामरा कुत्रा धरायला सांगते. पांढरपेशा वर्गातील- "नणदा भावजया खेळत होत्या" हें गाणें व अशिक्षित समाजांतील खालील गाणें एकाच धर्तीचीं आहेत—

## (३९) सासरच्या वाट गुजुगुजु काट

**सासरच्या वाट गुजुगुजु काट । ऊंऽहुं ।**
**कोण पावणा आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**सासरा पावणा आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**काय घेऊन आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**तोडं घेऊन आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**त्याचं मी तोडं लेयाची नाय । ऊंऽहुं ।**
**त्याच्या मी मागं जायाची नाय । ऊंऽहुं ।**
**चारी दरवाजे लावा ग बाय । ऊंऽहुं ।**
**झामरा कुतरा सोडा ग बाय । ऊंऽहुं ।**
**सासरच्या वाट............**

(गाणें वाढवून "सासरा" ऐवजीं "सासू" "तोडं" ऐवजीं "बांगड्या" व सासरच्या इतर नातलगांचीं व इतर दागिन्यांचीं नांवें घालून म्हणतात. नंतर......)

**नवरा पावणा आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**काय घेऊन आला ग बाय । ऊंऽहुं ।**
**भाकरी घेऊन आला ग बाय । ऊंऽहुं ।**

चारी दरवाजे उघडा ग बाय । ॐऽहुं ।
झामरा कुतरा धरा ग बाय । ॐऽहुं ।
त्याच्या मी मागं जायाची बाय । ॐऽहुं ।

## (४०) गावाखालती बारव

गावाखालती बारव । तिथं सया पाणी भरिती ।
गरगर घागर चक्री चुंबळ । हात वारिती पाणी भरिती ।
घागर बुडाली चुंबळ तरंगली । नगरमाशान[1] दे माझी घागर ।
सासरा माझा वगर[2] । ते मला मारल ।
सासऱ्याचा उंबरा । कधीं मला सुटल ।
बाप माझा विठ्ठल । कधीं मला भेटल ।
गांवा खालती बारव । तिथं सया पाणी भरिती ।
गरगर घागर चक्री चुंबळ । हात वारिती पाणी भरिती ।
घागर बुडाली चुंबळ तरंगली । नगरमाशान दे माझी घागर ।
सासू माझी वगर । ती मला मारल ।
सासूचा उंबरा । कधीं मला सुटल ।
आई माझी रुकमीण । कधीं मला भेटल ।

( याप्रमाणें दीर, भाऊ, नणंद, बहीण वगैरेंवरून गाणें वाढवतात. )

आपलें कौटुंबिक जीवन म्हणजेच स्त्रियांचें सर्व विश्व असल्यानें त्या कौटुंबिक जीवनांतच आंवतींभोंवतीं असणाऱ्या गोष्टी त्यांच्या गाण्यांचे विषय बनत असतात. कपडे व दागिने हा ओंवीगीतें, खेळाचीं गीतें, फेरावरील गीतें या सर्व प्रकारांत आढळणारा एक सामान्य विषय आहे. या गाण्यांतून कुटुंबांतील निरनिराळ्या नातलगांच्या परस्परांविषयीं भावना व्यक्त झालेल्या असतात. या खेरीज गाण्यांत अधिक आशय कांहींच नसतो. सर्व कडवीं सारखींच असतात. निरनिराळे अवयव व निरनिराळे दागिने यांचीं नांवें घालून तेंच कडवें गातात व गाणें वाढवतात.

---

१ मोठा मासा. २ द्वाड.

माहेरीं गेलेली मुलगी आईजवळ कपडे व दागिने मागते. आई सांगते भावजयीजवळून घे. पण नणंद म्हणते भावजय रागें भरते व भाऊही डोळ्यानें दापतो. भावाचें लग्न होईपर्यंत भाऊ हा बहिणींचें भरपूर कोड-कौतुक करीत असतो पण भावजय घरांत आली म्हणजे त्याच्या साऱ्या आकर्षणाचा बिंदु ती बनते अशा भावना या गाण्यांतून सरांस दिसून येतात:—

## (४१) आई मी खेळाया जातों

" आई मी खेळाया जातों।"
" जागे तूं माझ्या लेकी।"
" आई मला नेसाया नाहीं।"
" घे जा ती वहिनीची साडी।"
" वहिनी बा राग भरेल।
दादा बा डोळे मोडितो।"

" आई मी खेळाया जातों।
आई मला कानांत नाहीं।"
" घेजा ती वहिनीची कडी।"
" वहिनी बा राग भरेल।
दादा बा डोळे मोडितो।"

" आई मी खेळाया जातों।"
" जा गे तूं माझ्या लेकी।"
" आई मला अंगांत नाहीं।"
" घे गे ती वहिनीची चोळी।"
" वहिनी बा राग भरेल।
दादा बा डोळे मोडितो।"

" आई मी खेळाया जातों।"
" जागे तूं लाडक्या लेकी।"
" आई मला डोईंत नाहीं।"
" घे जा तें वहिनीचें फूल।"
" वहिनी बा राग भरेल।
दादा बा डोळे मोडितो।"

(निरनिराळया दागिन्यांचीं नांवें घालून हें गाणें वाढवतात.)

रामाजी सोनार या गाण्यांत सासरीं गेलेल्या सुनेचा हवादावो नणदा व जावा दोघीही करीत असतात म्हणून ती दागिने ल्यायला कचरते असें म्हटलें आहे......

## (४२) रामाजी सोनार

नदीच्या पऱ्याल रामाजी सोनार।
त्यांनीं घडविलं बुगड्यांच जोड।

" लेग लेग बाई।"
" कशी लेऊं दादा।
घरीं नणदा जावा।
करत्याल हेवादावा।"
" जावा घरोघरीं।
नणदा परोपरी।"

( बुगड्यांचे जोड ) या ठिकाणीं इतर दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात—उदाहरणार्थः—बांगड्याचा जोड, साखळ्या तोड.

( महार स्त्री–सातारा जिल्हा )

दागिन्यांवरून परस्परांचा हेवादावा करणाऱ्या सवतींचें गाणें पाहा—

**(४३) सवतींचें गाणें**

" तुला नथ घडविली मला नाहीं घडविली।
मी गेलें मुंबईला तूं कशी मोडिली?"
" उगी उगी सवती " " उगी कशी राहूं?
पाप्याचा जीव बघून झुलतो माझा जीउ।"
" तुला येळा घडवल्या मला नाहीं घडवल्या।"

( याप्रमाणें सर्व दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

**(४४)**

" आवत लिंबु लवत लिंबु " या गाण्यांतून माहेरीं आलेल्या मुलीचें कौतुक आई नवनवे दागिने तिच्यासाठीं घडवून कसें करतें तें दाखवलें आहे—

अवत लिंबु लवत लिंबु[1] लवत मोगरा जाई ग।
आवत तेडीचा मुऱ्हाळी नदी ओलांडून जाई ग।
लेक चांगुणाबाई ग येवढी सरी लेऊन जाई ग।

( सरीऐवजीं इतर दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

दागिन्यांचा सोस असणाऱ्या लहान मुलीवरून गाणें गाईलें आहे.

---

१ लिंबाचें झाड वांकलेलें.

## (४५) हातापरमाण मला बांगड्या घडवा जा

**हातापरमाण मला बांगड्या घडवा जा। बांगड्याचा जोड द्या बांगड्याचा जोड ।**
**राणीच्या बागेमधें नाचतो मोर वो । काळी चंद्रकळा शोभती पोर वो ।**
**येवढुसी पोर मोठी लई छंदखोर। टाकिती टिकली गोरिसी मोर वो ।**

(याप्रमाणें इतर अवयव व तदनुरूप दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

(महार स्त्री—सातारा जिल्हा)

## इतर गाणीं:—

खालीं दिलेलीं दोन गाणीं हीं भोंडल्याच्या गाण्यांपैकीं आहेत. परंतु भोंडला, हादगा, भुलाबाई हे खेळ पांढरपेशा वर्गातील मुली खेळतात. मराठमोळया किंवा महार चांभार स्त्रियांत हा खेळ नाहीं. त्यामुळें "एक एक लिंबु झेलीत गेलें" व "दवण्याचें गाणें" हीं गाणीं देखील फेरावरच गाईलेलीं आढळलीं.

भोंडल्याच्या गाण्यांतील ओळींचा अर्थाअर्थी संबंध लावणें कठिणच असतें. "एक एक लिंबु झेलीत गेलें" मधील कृष्णदेवाची निळी घोडी व त्याजवर बसून कमळें तोडणारी राणी यांचा संदर्भ लागणेंही कठिणच आहे.—

## (४६) एक एक लिंबु झेलीत गेलें.

**एक एक लिंबु झेलीत गेलें। कृष्णादेवाला सांगी केली।**
**कृष्णदेवाची निळी घोडी । त्याजवर बसुनी कमळं तोडी।**
**कमळामागं वो निघाली राणी। अग अग राणी इथं कुठं पाणी।**
**जमना नदीची केवाळ वाळू । तिथं खेळत चिलिया बाळू !**
**चिलिया बाळाचं काय काय लेणं ? सरीसाखळ्या पिंपळपान।**

(महार स्त्री—सातारा जिल्हा)

दवण्याच्या गाण्यांतील संदर्भांचेंही असेंच. कांहीं वेळा यमक जुळवण्या-करतांच "दवण्याची काडी" व "सुक्रुबानें बांधली माडी" यासारखे शब्दप्रयोग करतात. गाण्यांतील गतिमानता मात्र खेळाला साजेशीच आहे.

## (४७) दवण्याचें गाणें.

तिथं पडला थेंब तिथं उगवला दवणा उगवला दवणा ।
(चाल) दवणा नव्हं बाई दवण्याची काडी । आमच्या सुक्रुबानं बांधिली माडी ।
त्या माडीवर काढीला मोर । त्या मोराचा गुंजारी डोळा ।
(चाल) ढवळा पवळा जी नंदी । मोटा जुळील्या दोन्हीं ।
सोडा सोडा वो पानी । वरल्या बागच्या कोनीं ।
अशी माळीण नखऱ्याची । ओटी शंकर शेल्याची ।
हिरव लिंबु तोडीते । पिकलं लिंबू वो झेलीते ।
सई सई गोविंदा येतो । मजवरी गुलाल फेकीतो ।
तुझ्या गुलालाचा मार । माझा भांग झाला लाल ।

# स्त्रियांचे खेळ--

फेरावरील गीतांप्रमाणेंच निरनिराळ्या प्रसंगीं स्त्रिया एकत्र जमून खेळ खेळतात त्या वेळीं गाणीं म्हणतात. पांढरपेशा वर्गांतील स्त्रिया हरतालिकेचें व मंगळागौरीचें व्रत करतात, त्या दिवशीं रात्रीं जागून खेळ खेळतात, तर श्रमिक वर्गांतील स्त्रिया गौरीला किंवा नागपंचमीला एकत्र जमून खेळतात. दोन्ही वर्गांत कांहीं खेळ एकच असलेले दिसतात. हादगा, भोंडला, भुला-बाई हे मुलींचे खेळ प्रामुख्यानें पांढरपेशा वर्गांतच दिसतात. खानदेशांत व वऱ्हाडांत भुलाबाई दिसेल तर कोंकणांत किंवा घाटावर हादगा किंवा भोंडला दिसेल. सर्वांचें सार एकच दिसतें कीं हीं सर्व पावसाळ्यांतीलच व्रतें आहेत. श्रावणापासून भाद्रपद-अश्विनापर्यंत हीं निरनिराळीं दैवतें पुजलीं जातात व वरुण राजानें कृपादृष्टि ठेवावी म्हणून त्याला खुश

करण्याचे प्रयत्न चाललेले असतात. म्हणूनच सर्व गीतांचें मूळ महाराष्ट्राच्या कृषि-जीवनांतच आढळेल.

शेतकरी स्त्रियांचीं थोडीशीं खेळांचीं गाणीं मला मिळालीं आहेत. निरनिराळ्या मासिकांतून आतांपर्यंत अशीं पांढरपेशा स्त्रियांच्या खेळांचीं गाणीं येऊन गेलीं आहेत.

## झिम्मा—

झटीचा किंवा एका टाळीचा साधा झिम्मा सर्व स्त्रियांतच आढळतो. मराठमोळा शेतकरी स्त्रियांत हाच झिम्मा प्रामुख्यानें दिसतो. लाडूझिम्मा व झिम्म्यांत गोफासारखे निरनिराळे प्रकार बसवून केलेले झिम्मे हे पांढरपेशा वर्गांतील स्त्रियांनीं आपल्या कल्पकतेनें रचले आहेत.

फुगडी, झिम्मा या खेळांतून भरपूर खेळकरपणा असतो. या मनोरंजनाच्या प्रसंगीं नसतें गांभीर्य मुली आणीत नाहींत. उलट सर्वांना हंसविण्यासाठीं विनोदप्रचुर गाणीं म्हणतात. झिम्म्यावरील खालील दोन्ही गाणीं अशींच विनोदपरिप्लुत आहेत.

"खाल्ल्या पटींत वरल्या पटींत" या गाण्यांत कावळ्यानं राळ्याचं एक लोंबट खुडून सईच्या अंगणांत भिरकावलं व त्या एका राळ्याच्या कणसापासून सईनं पैसा कसा केला आणि शेवटीं दिरानं तिला चौदावं रत्न कसं दाखविलं याची मजेदार कथा आहे, आणि कथेचा शेवट हें सासर नकोच—माहेरच किती चांगलं या आपल्या आवडत्या कल्पनेकडे स्त्रियांनीं आणला आहे.

### (१) खाल्ल्या पटींत वरल्या पटींत : : :

**खाल्ल्या पटींत । वरल्या पटींत । पेरला राळा**
**बाई पेरला राऽळा ।**
**कोण्या देशींचा आला कावळा बाई आला काऽवळा ।**
**एक लोंबट खुडून नेलं बाई खुडून नेऽलं ।**
**सईच्या अंगणीं झोंकून दिलं बाई झोंकून दीऽलं ।**

सईनं उचलोनि घरांत नेलं बाई घरांत नेऽलं ।
कांडून कुटून राळं केलं बाई राळं केऽलं ।
राळ करुनी विकाया नेलं बाई विकाया नेऽलं ।
विकून टिकूनी पैसा केला बाई पैसा केऽला ।
पैका करुनी बांगड्या लेली[1] बाई बांगड्या ल्येऽली ।
बांगड्या लेवूनी घरला आली बाई घरला आऽली ।
घेतली घागर घेतली चुंबळ गेली पाण्या बाई गेली पाऽण्या ।
तिथं धाकला दीर उभा बाई दीर उऽभा ।
त्यानं चाबूक चमकाविला बाई चमकावीऽला ।
दुसरा चाबूक दूरच्या दूर बाई दूरच्या दूर ।
माझं माहेर पंढरपूर बाई पंढरपूऽर ।
पंढरपूरच्या बांगड्या साज बाई बांगड्या साऽज ।
येतां जातांना खळखळ बाज बाई खळखळ बाऽज ।

(महार स्त्री—सातारा जिल्हा)

"झटी मारी झटी" या गाण्यांत उपवधू मुलीची चेष्टा करून मुली आपलें मनोरंजन करून घेत आहेत. शेवटीं "दीर गेला ताकाला विंचू चावला नाकाला" हा अल्लड विनोद करून त्या मोकळेपणीं हंसतात.

## (२) झटी मारी झटी : : :

झटी मारी झटी कंपळ पटी ।
सईच्या सरी बापाच्या घरीं ।
बाप नाहीं सोनार ग सोनार ग ।
नथ नाहीं घडवली । पाया नाहीं पडवली
पाया ढोल ग ढोल ग । सवती बोल ग बोल ग ।
सवत बोल ना बोल ना । मांडव हाल ना हाल ना ।
मांडव सोन्याचा सोन्याचा । मुलगा वाण्याचा वाण्याचा ।

---

१. ल्याली

हळद लावून पिवळा केला । मारुतीच्या देवळांत नेला ।
आमची नवरी पुंजिती पुंजिती । जायकळ्या मागती मागती ।
जायकळ्या दाव ग दाव ग । आमची नवरी पाव ग पाव ग ।
आमची नवरी नेटाची नेटाची । चोळी शिवा चिटाची चिटाची
चीट गेलं लष्करीं लष्करीं । दोन आंब कुस्करी कुस्करी ।
एक आंबा हिरवा हिरवा । खाईल माझा दीर वा दीर वा ।
दीर वा गेला ताकाला ताकाला । विंचू चावला नाकाला नाकाला।
नाक करतं फुणफुण फुणफुण । उड्या मारतं टुणटुण टुणटुण ।

कृष्ण-लीलांच्या आधारें रचलेलें "सई सई गोविंदा येतो" किंवा "सर सर गोविंदा येतो" हें गीत सर्वांमध्येंच आढळतें--

( ३ ) सई सई गोविंदा येतो[1] :

सई सई गोविंदा येतो । मजवरी गुलाल फेकीतो ।
या या गुलालाचा मार । आमच्या येण्या झाल्या लाल
आमच्या येण्या गोकुळीं । सोनाराच्या साकूळी[2] ।
घडव घडव रे सोनारा । माणिक मोती डुलारा ।
डुलाराला खिडक्या । आम्ही बहिणी लाडक्या ।
लाड सांगू बापाला । मोती लावू कपाळा ।

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

खेळतांना नटलेल्या मुली आपल्या दागिन्यांवरून गातात—

( ४ ) झिमा पोरी झिमा । झिमाच्या हातीं । नाकांतलं मोतीं । पायांतल वाळ । वाज खुळखुळ ।।

## फुगडी : : :

फुगडीचा खेळ तर उत्साहाचा जणुं परिस्फोटकच असतो. खिलाडू वृत्तीची त्यांत कसोटी असते. फुगडी खेळतांना मुली एकमेकांना उखाणे

---

१. हें गाणें थोड्या फरकानें म. सा. पत्रिका १९२९ च्या एप्रिलच्या अंकांत श्री. डोंगरे यांनीं दिलें आहे. २. साखळ्या.

घालतात व त्यांत परस्परांची भरपूर चेष्टा करतात. पण त्यांत कुणी रागावत नाहींत, तर एकीनें चेष्टेचा उखाणा घातला तर दुसरी त्यावर सवाई चेष्टेचा घालीत असते.

बहिणी-बहिणी फुगडी खेळतात, तेव्हां दोघींचा समावेश करून उखाणा म्हणायचा तर आपल्या घराण्याची थोरवी बहुधा इतरांना ऐकवीत असतात—

(५) लिंबळगांव नगरी भोंवतानं डगरी[1] ।
सोन्याची कुलपं मोत्यांचीं झुलपं ।
आम्ही लेकी थोराच्या लिंबाळकराच्या ।

(६) वाकडीतिकडी बाभळ त्याच्यावर बसला होलो[2] ।
इकडुन दिला टोला गंगेला गेला ।
गंगेचीं माणसं मक्याचीं कणसं ।
आम्ही लेकी थोराच्या वाकरीकराच्या ।

(७) चहाबाई चहा गवती चहा ।
बहिणी-बहिणींचीं फुगडी पहा ।
पहा तर पहा नाहींतर उठुन जा ।
आमच्या फुगडीला जागा द्या ।

एक बहीण दुसऱ्या बहिणीला उखाणा घालते तेव्हां मात्र मेहुण्यावरून खिजवते--

(८) माझा मेव्हणा मक्यांत ग मक्यांत ग ।
सोळा कणसं काखेंत ग काखेंत ग ।
म्होरं चाललाय झुकत ग झुकत ग ।
मागनं कुत्रीं भुकत ग भुकत ग ।
माझा मेव्हणा विहिरींत ग विहिरींत ग ।
धोतर फाटलंय टिरींत ग टिरींत ग ।

१. उंचवटा. २. होला पक्षी.

म्होरं चाललाय झुकत ग झुकत ग !
मागनं कुत्रीं भुकत ग भुकत ग !
माझा मेव्हणा असातसा असातसा ।
हातांत कुंचा मांग जसा मांग जसा ।
म्होरं चाललाय झुकत ग झुकत ग ।
मागनं कुत्रीं भुकत ग भुकत ग ।

नणदा-भावजयाच्या फुगडींत नणंद भावजयीला भावावरून उखाणे घालून चिडवते--

(९) कोथमिरीची काडी लवते कशी ।
दादाला बायको शोभते कशी ।
आम्हाला वहिनी लागते कशी ?

(१०) अंगारा म्हणा अंगारा सांधी कुंधी[1] अंगारा ।
दादा गेला चुलीम्होरं वहिनी मारी गुंगारा ॥

(११) फुगडी फुलदार भाऊ शिलेदार ।
भावाच्या हातीं खोबऱ्याची वाटी ।
फोडून पहाती खापरखोटी ।
मार बर मार ।
दारीं बसलाय हवालदार ।
चोळया शिवतोय हिरव्या गार ।
टिपा टाकतोय आणीवार ॥

(१२) झग्याची फुगडी झक मारिती ।
शिंप्याची पोरगी हाक मारिती ।
बंधु माझा नेणता ।
त्याला शिवला घोंनता[2] ।
आसूड केला दुमता[3] ।

---

१. कानाकोपऱ्यांतून. २. घोंगता = आंगरखा. ३. दुमडला.

आसूड झाला म्हातारा ॥
त्याला दाखवला सातारा ॥

(१३) असा भाऊ भोळा बायका केल्या सोळा।
केल्याती केल्या पळूं पळूं गेल्या।
पळतां पळतां मोडला कांटा।
शंभर रुपयाला आला तोटा।

फुगडीच्या इतर उखाण्यांतूनही उखाणा घालणारी मुलगी दुसरीची चेष्टा करते--

(१४) असा कसा अंगठीवरला ठसा।
अंगठी गेली मोडून।
अशी लेक साळ्याची भाकरी खाईना राळ्याची।
पाणी पिईना शाडूचं काम करीना कवडीचं।
कांदा खाईना पातीचा नवरा मागते जातीचा।
फू बाई फू.........

(१५) आडाव म्हण आडाव।
माझ्यासंग फुगडी खेळतय म्हातारं गाढव।

(१६) तुमच्या घोड्याचा मोडला पाय।
खुर्चीवर बसून खोबरं खाय।

(१७) हातांत शेला झळकत गेला।
हातपायाचीं बोटं ग।
इडणीकरांची[1] स्वारी निघाली।
तगारीवाणी[2] पोट ग।

(१८) फुगडी फुलती दोघे बोलती।
चावडीखालीं साप गेला चावडी डुलती।

---

१. स्थानिक उल्लेख असावा. २. तगारें = घमेलें

जात्यावरच्या ओव्यांप्रमाणें या उखाण्यांतूनही इतर विषय येतात. ठेवलेल्या स्त्रीवरून खालील उखाणे म्हटले आहेत--

(१९) अज्याल भिंत पज्याल भिंत।
मधल्या भिंतीला लिंपावं किती ?
ठेवलेल्या रांडेला जपावं किती ?

(२०) डाळ म्हणा डाळ हरबऱ्याची डाळ।
ठेवलेल्या रांडेला पुतळ्याची माळ।

(२१) काडी म्हणा काडी गुलाबी काडी।
ठेवलेल्या रांडेला गुलाबी साडी।

चेष्टा न करतां म्हटलेलें सोज्वळ उखाणेही सांपडतात--

(२२) इसाची चोळी तिसाच्या वेळा।
खडीच्या लुगड्यावर पुतळ्याच्या माळा।

**कोंबडा--**

खालीं बसून एका पायावर दुसरा पाय घालावयाचा व दोन्ही गुडघ्यांवर हाताची पंजाची साखळी करून टेकलेल्या पायावर उड्या मारीत पुढें जावयाचें हा कोंबड्याचा खेळ सर्व जमातींतून आहे. यांत कोंबड्यांचीं गाणीं म्हटलीं जातात. भोंडल्याच्या गाण्यांप्रमाणेंच या गाण्यांमध्यें सुसूत्रता आढळणार नाहीं. भावाप्रमाणेंच दिरावरून त्यांत कौतुकानें गातील व त्यावरून एकदम मैत्रिणीकडे धाव घेतील. कोंबडा खेळतांनाच शेवटीं पिंगा घालण्याचाही प्रकार असावा असें (८०) गाण्यांत दिसते. (८१) गाणें हें अधिक आधुनिक वाटतें. मुकादमाला शपथ घालूनही आज मजूरी लागत नाहीं म्हणून त्यांत नटवा दाजीबा दीर नारीला सांगत जातो. (८२) गाण्यांत कोंबड्यावरून शेवटीं घोड्यावर खेळ येतो.

**(२३) खुड खुड मेल्याचा कोंबडा।**

खुड खुड मेल्याचा कोंबडा। घे घागर घे चुंबळ।
पाटीखालीं मी डालिला। चल ग सईना पाण्याला।

दीर बाई दाजीबा नटवा। माझा राघू तान्हेला।
सोन्यारुप्याचा बटवा। एवढीच घागर आगूंदे।
परसामागं ठेवूंदे।

असा परास साऱ्याचा।
बाजार भरला मोत्याचा।
मोत्याला आल्या शेंगा।
घाल ग पोरी पिंगा।
एकीचा कां दोघींचा।
माईणकरणी लेकीचा।

किंवा कोंबड्याचें गाणें

खुड खुड मेलयाचा कोंबडा।
पाटीखालीं मी डालीला।
दीर बाई दाजीबा नटवा।
सोन्यारुप्याचा बटवा।
चंदाई कुरवीली[1] कुरवीली।
वरात मिरवली मिरवली।
गेलाया नारीला सांगत।
आज नाहीं मंजुरी लागत।
मुकादमाला आगत।

इतर खेळ:

"जकडीचा किंवा घोड्याचा खेळ" हें नांव केवळ घोड्यासारखें ओणवें राहून हा खेळ खेळावयाचा म्हणूनच दिलेलें असावें. यांत दोन मुली व आजी यांचा संवाद आहे. आजीचें नातवावर किती प्रेम असतें तें गाण्यांत शेवटीं दाखवलें आहे.

---

१. करवली.

## (२४) जकडीचा किंवा घोड्याचा खेळ

एक म्हणते......बाई बाई जागा सारवूं कां ?
दुसरी......नग.
पहिली......बाई बाई एवढी जागा सारवूं कां ?
( हातांनीं दाखवून विचारते )

दुसरी......नग.
पहिली......बाई बाई एवढी जागा सारवूं कां ?
( अधिक मोठी जागा दाखवते )

दुसरी......नग.

( दर वेळीं अधिक मोठी जागा हातांनीं दाखवून पहिली विचारते )

पहिली......दाणे वाळत घालूं कां ?
दुसरी......घाला.
पहिली......चिमण्या खात्याल कीं ?
दुसरी......खाऊ परत्या.
पहिली......दाजीबा मारत्याल कीं ?
दुसरी......मारु परत्या.

(पहिली दुसरीला चावी देते. दुसरी धुण्याला जाते. धुणें धुवून येते.)

दुसरी......दाणं कुणी खाल्लं ?
पहिली......चिमण्यांनीं खाल्लं.
दुसरी......गीता कुठं गेली ?
पहिली......बाळंतपणाला गेली.
दुसरी......काय झालं ?
पहिली......मुलगा झाला.
दुसरी......कसला झाला ?
पहिली......काळा काळा भिन्न झाला

( दुसरी तोंड फिरवते. तेव्हां—— )

पहिली......गोरा गोरा हळदीचा ओंडा रेशमाचा गोंडा।
दुसरी......एवढी एवढी अफू देऊन माराया नव्हतं आलं?
आजी......अगबाई माझा नातुक नातुक।

या खेळांतही दोन मुलींचा संवाद आहे. निरनिराळ्या दागिन्यांवरून हें गाणें व संवाद वाढवला जातो.

## (२५) जोडीचा खेळ

एक मुलगी...तुला काय पाहिजेल ग। पऱ्या मोगरा।
दुसरी मुलगी...मला तोड पाहिजेल ग। पऱ्या मोगरा।
पहिली मुलगी...तुला तोडं घडवीन ग। तुझ्या पायांत चढवीन ग।
तुझा पाय शोभीतो। माझा जीव रंभीतो।
दुसरी मुलगी...अशी कां बोलली गुललालणी।
पहिली मुलगी...तुला काय पाहिजेल ग। पऱ्या मोगरा।
दुसरी मुलगी...मला बाळ पाहिजेल ग।

(निरनिराळ्या दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

"कीकीचा खेळ" हा पांढरपेशा स्त्रियाही खेळतात व त्याचें गाणें प्रसिद्ध व लांब आहे. या गाणाऱ्या महार स्त्रियांनीं "सागर मासा" ऐवजीं "सौदर मासा" शब्द वापरला आहे. या गाण्यांत कदाचित ब्राह्मण स्त्रियांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करून अखेर ब्राह्मणांचीच टिंगल केलेली आहे. आळीपाळीनें एकेक हात कपाळाला लावून व वाकून हें गाणें म्हणतात.

## (२६) किकीचा खेळ

किकीचं पान बाई की की।
सौदर मासा सूं सूं।
केळीच्या पानावरी बामण जेवीतो।
सुपान फडक्यावरी लग्न लावीतो।

## (२७) दिंड खेळ

दिंडा मोड ग पोरी । दिंडाच्या लांब लांब दोरी ।
दिंडाखालीं कोण ग उभं । मी नव्ह भावोजी ।
हातांतल्या बांगड्या काय ग केल्या ।
आली होती तोडवाली तिला मी दिल्या ।
तुझं काय गेलं माझ्या बापानं केलं ।
दिंडा मोड ग पोरी । दिंडाच्या लांब लांब दोरी ।
दिंडाखालीं कोण ग उभं । मी नव्ह भावोजी ।
हातांतल्या पाटल्या काय ग केल्या ।
आली होती वाळवाली तिला मी दिल्या ।
तुझं काय गेलं माझ्या बापानं केलं ।

( याप्रमाणें सर्व दागिन्यांवरून म्हणणें. )

## झेपा

शरीराच्या पायापासून डोक्यापर्यंत सर्व अवयवांचा अुद्देशून खालील गीत गातात व नाचतात.

## (२८) हित बाई इंचु चावला ग बाय

हित बाई इंचु चावला ग बाय ।
डोंगरी दिवा लावला ग बाय ।
हित बाई साप चावला ग बाय ।
डोंगरी दिवा लावला ग बाय ।
हित बाई इंगळी चावली ग बाय ।
डोंगरी दिवा लावला ग बाय ।
हें काय ?
डोक्स
डोक्स्यावर काय ?
मास

**मासावर काय ?**
**केस**
**केसावर काय ?**
**पदर**
**पदरावर काय ?**
**चुंबळ**
**चुंबळीवर काय ?**
**पाटी**
**पाटींत काय ?**
**गोपा**
**घाल पोरी झेपा । पाटींतला गोपा ।**

लहान मुलींचा " भाजी घ्या भाजी " खेळ म्हणजे दोन मुलींचा संवाद आहे.

## (२९) भाजी घ्या भाजी

**" भाजी घ्या भाजी "**
**" नग "**
**" भाजी घ्या भाजी "**
**" आण इकडं कशाची ? "**
**" मेथीची "**
**" पैशाची किती ? "**
**" वीस "**
**" बाई बाई दरवाजा केवढा ? "**
**" एवढा न् एवढा "**
**" लोखंडी सारजा पाणी भर गिरजा "**
**" खालीं पडलय झेलून घ्या "**

याशिवाय पांढरपेशा स्त्रियांत शाळुकी शाळकी, आगोटा पागोटा, नखुल्याबाई नखुल्या, कारसकाऱ्या, हटुशा बाई हटुशा, कीकीचं पान बाई कीकी, गाठोडें, खुर्ची का मिर्ची, गोफ वगैरे खेळाचे प्रकार व त्यावरील गीतं प्रचलित आहेत. शरीराला व्यायाम होण्याच्या दृष्टीनें हे खेळ आधुनिक शास्त्रोक्त पद्धतीनें बनविलेल्या खेळांची सहज बरोबरी करतील. हास्यरस व खेळकरपणाला यांना भरपूर वाव असतो. खेळांचे उत्सव म्हणजे स्त्रियांचा मोठाच विरंगुळा असतो.

## शिमगा

श्रमिक वर्गात शिमगा हा एक अतिशय हौशीचा सण असतो. विशेषतः नागपंचमी हा जसा स्त्रियांचा सर्वांत महत्त्वाचा व मनोरंजनाचा दिवस तसा शिमगा हा पुरुषांचा. खालील गीतांतून कांहीं गीतें स्त्रियांकडूनहि मिळालीं आहेत. शिमग्यांत सोंगें घेऊन शहरांतील गडीलोक नाचायला खेळायला जातात हें आपण पहातोंच. आपल्याकडे स्त्रिया या कार्यक्रमांत भाग घेत नाहींत परंतु पुरुषांचीं गीतें ऐकून त्यांनाहीं तीं येत असावीं किंवा त्यांनीं रचलींही असावींत.

पुरुषांकडून मिळालेलीं खालील तीन गीतें आहेत. गिरणीचें गाणें हें मुंबईच्या गिरणींतील वातावरणाचें एक चित्र आहे. एका मजूर स्त्रीकडून रहाटाचा पट्टा तुटतो म्हणून तिला नायकीण ( मुकादमीण ) पगार देत नाहीं व ती स्त्री पगार घरीं नवऱ्याला देत नाहीं म्हणून नवरा तिला मारतो असें हें मजूर स्त्रीच्या दुहेरी छळणुकीचें शब्दचित्र आहे.

स्त्रियांकडून मिळालेलीं गीतें हीं मात्र सर्व शृंगारिक किंवा अगदीं ग्राम्य अशीं आहेत. कांहीं गीतें हीं शिमग्याप्रमाणें गणपतीचें वेळींहि म्हणतात.

( १ ) शिमग्याला चुटक्यावर गडीलोक म्हणतात—

**दरवा भरला काठोकाठीं पाणी चाललय ग गजरेला।**
**दादरावरले राईबाई तुझ्या गजऱ्याचं मोल काय।**
**सवा रुपया दोन आणे देऊं काय।**
**गाडी आली भवऱ्याची।**
**माझ्या बाबईबाईच्या नवऱ्याची**
**गाडी आली भवऱ्याची।**
**माझ्या कस्तुरीच्या दिराची।**
**गाडी आली भवऱ्याची।**
**माझ्या डाळुंबीबाईच्या सासऱ्याची।**

गाडी आली भवऱ्याची ।
माझ्या आबुबाईच्या सासूची ।

(महार पुरुष—सातारा जिल्हा)

(२) रामा हो रामा रामाच्या बागेमधीं हो मधीं ।
चवरा[1] मोठा दोन्ही वो दोन्ही ।
आंब्याची सावली चींचेवरी ।
जाईला पाणी जातया झुळझुळवाणी ।
आंब्याची सावली चींचेवरी ।
रामाचं ध्यान गेलं सीतेवरी ।
रामा रामा हो रामाच्या बागेमधीं हो मधीं ।
चवरा मोठा दोन्ही वो दोन्ही ।
जाईला पाणी जातया झुळझुळ वाणी ।
बोराची सावली पेरूवरी ।
रामाचं ध्यान गेलं सीतेवरी ।

(इतर फळांचीं नांवें घालून गाणें वाढवतात.)

(महार पुरुष—जिल्हा सातारा.)

(३) गिरणीचें गाणें—(गणपतीच्या वेळीं म्हणतात)

गिरणीमधें गिरण कुरळ्याची[2] । हवा येते सुपारी[3] बागेची ।
नवरा बिचारतो बायकोला । सर्व्या लोकाचा पगार झाला ।
माझी कामकरणी ग । पगार काय केला ।
रहाटाचा तुटला पटा । याची सय नाहीं झाली मला ।
त्या नायकिणीनं पगार बंद केला । अशी धावत पळत गेला ।
हे काय भवांच्या[4] गिरणींत । या वो हाक मारितो नायकीणबाईला ।
आहो आहो नायकीणबाई । सर्व्या लोकाचा पगार दिला ।

१ चवर = मोहोर. २, ३, ४ हीं मुंबईतील विशिष्ट गिरण्यांचीं मजुरांत रूढ असलेलीं नांवें आहेत.

तीन फेरजी फिरल्या
चवथ्या पांचव्या फेराला
भारजाचा हार तुटतो—
तुटला गळ्यांतील हार
भारजानं फेरजी सोडिला
लागली मोती वेचायाला
सया निघून गेल्या घरला
मोती वेचता झाली रात्र
भारजानं मोतीजी वेचिले
वाटमारगीं लागली
आली आपल्या वाड्याला
हाका मारली सासूला

भारजा—

" आवो आवो सासूबाई
मला घरामधीं घ्यावं

सासू—

" आमचीं कवाडं सायांचीं[1]
कुलपं निघना तांब्याचीं
एवढ्या रातचं काय ग काज ?
जा माहेरीं कर जा राज"

( याप्रमाणें सासरा, दीर, जाऊ, पति या सर्वांच्या महालीं जाते व प्रत्येकाकडून तेंच उत्तर मिळाल्यावर माहेरीं जाते )

माहेरीं—

भारजा तेथून निघाली
वाटमारगीं लागली
आली वेशीच्या बाहेरी
लागली वनाच्या वाटेला
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
आलं भारजाचें माहेर
गेली वेशीच्या आंत
गेली बापाच्या वाड्याला

भारजा—

" अर अर माझ्या बापा
माझा बापची होशील
मला घरामधीं घेशील "

बाप—

आमचीं कवाडं आंब्याचीं
कुलपं निघना तांब्याचीं
येवढ्या रात्रीचं काय ग काज ?

( याप्रमाणें भारजा आई, भावजय, बहीण या सर्वांकडे जाते व तिला तेंच उत्तर मिळतें )

अखेर आत्महत्या करण्यास निघते—

---

1 सागवानी.

भारजा तेथून निघाली
आली येशीच्या बाहेरी
लागली वनाच्या वाटला
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
भेटलीं हत्तीचीं खिल्लारं

भारजा—

" अर अर खिलाऱ्यादादा
येवढा शिनगार देतें तुला
अंजनडोह दाव मला "

हत्तीचा खिलारी—

" येवढा शिनगार नको बाई
अंजनडोह ठाव नाहीं "

(याप्रमाणें घोड्याचीं, उंटाचीं, म्हशीचीं, बैलाचीं, गाईचीं, मेंढ्यांचीं खिलारं भेटतात व प्रत्येक खिलाऱ्याशीं हाच संवाद होतो. अखेर—)

तिथनं म्होरच निघाली
भेटलीं शेळ्यांचीं खिलारं

भारजा—

" अर अर खिलाऱ्या दादा
एवढा शिनगार देतें तुला
अंजनडोह दाव मला

शेळ्यांचा खिलारी—

" एवढा शिनगार देग बाई
अंजनडोह ठाव आहे "

काढला सारा शिनगार
त्याचं गाठोडं बांधीलं
दिलं खिलाऱ्यादादाला
" तूंच जन्माचा मायबाप "
गेली डोहाच्या जवळीं
घातली आपली कांस[2]
दंडीं पदर सावरीला
बांधली केसाची जुडी
आधीं टाकिला खडा[3]
मग टाकिली काडी
मग घातयीली उडी
नागरपंचमी भोवली भारजाला
परणाचा घात झाला

(महार स्त्री—पुणें जिल्हा)

" जैता " च्या गाण्यांत मायलेकींच्या प्रेमाची कोमलता एका नावीन्यपूर्ण प्रकारानें दर्शविली आहे नागपंचमीच्या फेराला जायला निघते म्हणून जैताची सासू तिला दटावते. जैता रागावून माहेरीं निघून जाते. पण माहेरीं ती दासी म्हणून राहते. दळण दळायला दिलं तेव्हां ती जात्यावर

१ शृंगार. २ कासोटा. ३ पाण्याच्या खोलीचा अंदाज घेण्याकरतां.

ओव्या गाऊं लागली. त्या ओव्या आईबापांच्या व भाऊभावजयीच्या नांवानें गाते तेव्हां आईला जैताच्या आवाजाची आठवण होऊन ती रडते. भावजय तिला म्हणते " जैताचा आवाज कुठला ? जैता तर " सात कोट उपर माडी "वर नांदते आहे." आईबाप जैताला ओळखीत कसे नाहींत हा प्रश्न बाजूलाच ठेवायचा.

( ६ ) जैता

जैता पंचमीच्या फेराला जाते—
आली वर्षाची पंचम
चल ग जैता खेळाया
ठिवलं घंगाळांत पाणी
गेली अष्टीच्या[1] घरांत
काढलं अष्टीचं पातळ
गेली मदम्या[2] घरांत
काढली मदमा काचोळी
घेतला झरझेरा[3] रुमाल
हळदी कुंकवाच्या पुड्या
अबीर बुक्काईच्या पुड्या
निघाली वाड्याच्या बाहेरी
गेली नदीच्या नेहरीं[4]
सासू दटावते म्हणून जैता
रागावून निघून जाते-
तिला डोळ्यान दापिली
रडत फुंदत वाड्यांत आली
गेली अष्टीच्या घरांत
फेडलं अष्टीचं पातळ
गेली मदम्या घरांत
काढली मदमा काचोळी
दोन वर्षांचं[5] लुगडं
तीन वर्षांची चोळी
निघाली वाड्याच्या बाहेरी
गेली नदीच्या नेहरीं
लागली वनाच्या मारगीं
एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिलीं
तीन वनं वलांडिलीं
चौथ्या पांचव्या वनाला
दिसलं जैताचं माहेर

जैता माहेरीं दासी म्हणून राहते--

दिसलं जैताचं माहेर
गेली नदीच्या नेहरीं
पाण्या आल्या होत्या दासी
जैता—
" तुम्ही दासी कोणाच्या ? "

---

१ अष्टी–अष्टीचं पातळ ज्या खोलींत ठेवलें ती खोली. २ मदम्या घर–मदमा काचोळी ज्या खोलींत ठेविली होती ती खोली. ३ रेशमी. ४ किनाऱ्यावर. ५ दोन वर्षांचं जुनं.

दासी—

" आम्ही बापू रतनाच्या "

जैता—

" बापू रतनाला सांगा
आली मुलुखावरली दासी
करील द्ळण मळण
खाईल कलनाची कोंडा[1] "
तिला वाड्याला नेली
एक रातराजी[2] गेली
दुसऱ्या रात्रीं दळण दिलं

जैताच्या ओव्या—

" पहिली ग माझी ओवी
बापा माझ्या रतनाला "
माता रडे घळघळा

आई—

" माझ्या जैताचा गळा "
सून बोलते सासूला

भावजय—

" वेड्या झाल्याजी आवोजी
सात कोट उपर माडी
तेथं नांद जैता लाडी
नख नदर पडना
मुख कुठलं पडाया ? "

जैता—

" दुसरी ग माझी ओवी
माता माझ्या मद्मेला

( याप्रमाणें बहीण कासईला, भाऊ-चांदाला व भावजय हौसाईला अशा पांच ओव्या जैता गाते व गाणें वाढवलें जातें )

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

शाबूच्या किंवा सासू सुनांच्या गाण्यांत घटनांचा गोंधळ पुष्कळच झालेला आहे. सासू सुनांचें भांडण झालें म्हणून सासू नागाला मारते व माशाची भाजी म्हणून सुनेला खायला घालते. तिचें प्रेत पुरून टाकते. नवऱ्याला व आईला कुणालाच पत्ता नसतो. सासू सांगते माहेरीं गेली असेल. शेजाऱ्याला थाप देते बाळंतीण आहे. नवरा पण सासुरवाडीला अशीच थाप देतो, त्यामुळें आई बाळंतिणीच्या तयारीला लागते. पण प्रत्येक वेळीं तिला अपशकुन होतो. कुंकू सांडतें, हिरव्या बांगड्या फुटतात, इ. आईला संशय येतो शाबूला दगा झाला. शाबू नवऱ्याच्या स्वप्नांत जाऊन त्याला सांगते व नवरा तिचें सरण रचून तिला जाळतो. शाबू बाळंतीण आहे हें नवऱ्याला कां कळूं शकत नाहीं ? नवरा आईच्या कटांत

---

१ कळणा कोंडा = धान्याचा चूर ( गरिबाचें अन्न ). २ रात्र.

सामील नसतांनाही सासूला फसवतो कां ? इ. गोष्टी कळायला मार्ग नाहीं. शावूच्या गाण्यांत गोष्टीचा घोंटाळा असला तरी शब्दसंपत्ति व योजकता भरपूर आहे. "धुनसुन", "दणकून" हे शब्द सार्थ वर्णन करणारे आहेत. आई कडी तोडे करायला जाते ते मोडून जातात, हिरवं पातळ घ्यायला जाते तें फाटून जातें, इ. गोष्टींचे अपशकुन गोष्टीला योजकतेचा चांगला रंग आणतात.

(७) सासू-सुनांचें गाणें–

शावू —

सासू-सुनांचें भांडण
सुनबाई बसली धुनसून
सासू उठली दणकून
ठाल्यांठुल्याजी येचिल्या[1]
हिनें कांडील्या कुटील्या
हिनें दळील्या मळील्या
हिनें भाकरी रांधील्या

सासू सुनेला विष घालते--

गेली लेकाच्या नांगरीं
"लेका भाकरी कुठं ठेवूं?"
"ठिवाया आंब्याच्या वनीं"
तिथं निघाला ढवळा नाग
तिनं मारीला मुरीला
शेल्या पदरी बांधीला
"घ्या सूनबाई मासोळ्या"
तिनं घेतील्या रांधील्या
"या सासूजी जेवाया"
"माझं पोट वो दुखतं"
शावू बसली जेवाया
दोन गिरास[2] वो सादील
तिसरा घास वो कडू लागला
"आवो आवो सासूबाई
तिसरा घांस वो कडू लागला"
"येडी झाली काय शावुबाई?"
तुझ्या माहेराचा माळी आला
कडू मिरच्या देऊन गेला"
चौथा घास कडू लागला
"आवो आवो जी सासुजी
चौथा घास कडू लागला"
"येडी झाली काय शावुबाई!
तुझ्या माहेराचा तेली आला
कडू तेल देऊंन गेला"
चौथ्या पांचव्या घासाला
शावूला लटपट झाली
शावूला मूर्त येळ आली

सासू सुनेला पुरून टाकते--

सासू गेली शेजारणीजवळीं
"फडकुदळ देजा मला"
"फडकुदळ काय काम?"

---

[1] ठाळा = झाडाची लहान डहाळी. [2] घांस.

" शावू माझी बाळंतीण "
फखकुदळ घेतलं
शावू गाडून टाकीलं
शावू नवऱ्याच्या स्वप्नांत जाते–
शावू सपनांत गेली
" तुझ्या आईनं घात केला
नवरा आईला विचारतो—
" साती उतरंड्या उतरीलया
साती मुखा दिसलया
एक मुख दिसत नाहीं "
आई—
" गेली असेल म्हणली माहेरा "
नवरा शावूच्या माहेरीं जातो–
घोड्यावरती स्वार झाला
चालला सासूच्या गांवाला
दुरून ओळखीलं सासूनं
" माझा जावइबोवा आला "
हातीं घेतली पाण्याची झारी
तुमचं पाणी आमच्या शिरीं
आमची शावू तुमच्या घरीं
दिला पलंग टाकुनी
दाजी निजरागती झाला
शावू सपनांत आली
" उठ र मातानं घात केला
तुझ्या बयानं घात केला "
साती उतरंड्या उतरीलया
आई—
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला ? "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
आई नातवाच्या बाळंत-
विड्याच्या तयारीला लागते—
गेली सोनाराच्या घरीं
आई—
" अर अर सोनारदादा
कडीतोडे देजा मला "
सोनार—
" कडीतोड्याचं काय काम ? "
आई—
" शावू आमची बाळंतीण "
कडीतोड मोडून गेलीं
आई—
" खरं सांगा जावईबुवा
आमच्या शावूला दगा झाला ? "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
सासू तेथून निघाली
गेली शिंप्याच्या आळीला
आई—
" अर अर शिंपीदादा
अंगड टोपडं देजा मला

हिरवं पातळ देजा मला "
हिरवं पातळ फाटून गेलं
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला घात झाला "
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई?
तुमच्या शावूला लेक झाला "
सासू तेथून निघाली
गेली साथी सजणापोशीं[1]
आई—
" अर अर सातीसजणा
कुकुम चिठी देजा मला "
शिंपी—
" कुंकम चिठीचं काय काम?"
आई—
" आमची शावू बाळंतीण "
कुंकु मचिठी सांडून गेली
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला?"
जावई—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
आई तेथून निघाली
गेली कासाऱ्याच्या घरीं
" अर अर कासारदादा
हिरवा चुडा देजा मला "
कासार—
"हिरव्या चुड्याचं काय काम?"
आई—
" शावू आमची बाळंतीण "
हिरवा चुडा फुटून गेला
आई—
" खरं सांगा जावईबोवा
आमच्या शावूला दगा झाला ?"
नवरा—
" येड्या झाल्या कां सासूबाई ?
तुमच्या शावूला लेक झाला "
माता तेथून निघाली
गेली बुरूड आळीला
आई—
" अर अर बुरूडदादा
येळू[2] कळंक देजा मला "
बुरूड—
" येळू कळक काय काम ? "
आई—
" शावू आमची बाळंतीण "
येळू कळक मोडून गेला
" खरं सांगा जावईबोवा
माझ्या शावूला दगा झाला ?"
दाजी तेथून निघाला
गेला मरण पुवीला[3]

---

१ साथी सजग = मित्र. २ बांबू. ३ स्मशानभूमी.

**सरण शावूचं रचीलं**
**शावू सरणांत घातली**
**खबर बयाला[1] कळाली**
**बया धावत पळत**
**गेली सरणा वो जवळीं**
**आई--**
**" आवो आवो जावईबोवा**
**सरण कुणाचं जळतं ? "**
**नवरा " सरण शावूचं जळतं "**
**पांच येढं[2] वो घातील**
**आईनं उडी टाकीली**

( मराठा स्त्री–पुणं जिल्हा )

# पौराणिक कथा-गीतें

शिवपार्वतीचा सोंगट्यांचा खेळ हा पुराणांतील एक लोकप्रिय झालेला विषय आहे शंकर डाव हरतो आणि नारद कळ फिरवतो. बैरागी होऊन शंकर कैलास पर्वतावर धुनी घालून बसतो. पार्वती भिल्लिणीचा वेष घेऊन त्याच्यावर मोहिनी घालून त्याला जिंकते.

शंकरपार्वतीच्या पटावरील खेळांत हत्तीघोड्याऐवजी नंदी आहे. पार्वतीनें घेतलेल्या भिल्लिणीच्या वेषाचं वर्णन यथार्थ आहे. भिल्लिणीचं रूप पाहून चंद्रसूर्य देखील लपून बसतात शंकरपार्वतीच्या स्वभावचित्रणांत पुरूष व स्त्रीच्या भावनांतील फरक चित्रित केला आहे. भिल्लिणीची मोहिनी पडतांच माझें मागें पुढें कोणी नाहीं, आपण गोसावी होवूं म्हणून शंकर तिच्या नादी लागतो तर पार्वती त्याला पार्वतीसारख्याच रत्नाची आठवण करून देते.

## (८) शिवपार्वतीचा डाव

**सारंग पाट[3] डोंगरावरीं । तेथें खेळे भीमाशंकरीं ।**
**तिथं येवश्या[4] आल्या सत्वरी । कळ रविलाची फारी ।**
**पारवती म्हणे शिवा । डाव पंजेचा मांडावा ।**

---

१ बया = आई. २ प्रदक्षिणा. ३ सारीपाट. ४ वेश्या.

डाव पहिला गीरजेचा । नंदी हीराऊनी घेतला ।
सारंगपाट खेळली गिरजा । जिंतिलाचि शंभु राजा ।
धरी शंकराच्या हाताला । जावा म्हणती वनवासाला ।
शंकर क्रुद्धानं[1] दाटला । शंकर नीघून चालला ।
मार्गी नारद भेटला । हर्कागत नारदाला ।
सारंगपाट खेळली गिरजा । जिंतिलाचि संभु राजा ।
मला म्हणती वनवासाला जावा । नारद बोल वचनीं ।
आग लागो या खेळाला । द्यावी सोडून या गिरजाला ।
तुम्ही जावं पाशी वनाला । धुनी घालुनी बसावा ।
बारा न बारा वर्सं झालीं । आठवण झाली गिरजाला ।
आग लागो या खेळाला । धनी कैलासाला गेला ।
कुणी येवशीन फितवुनी नेला । गिरीकंदरीं जाऊन बसला ।
मन्नाचा धट केला[2] । वेस[3] भिल्लिणीचा घेतला ।
चोळी उरफटी अंगाला । बाणाचा भाता पाठीला ।
हातीं तीरकमठा घेतला । चुन्याची टिकली गालाला ।
निघाली शोधावयाला । रणवन शोधून जीव दमला ।
हिमंचाल पारवताला । गेली त्याच वनाला ।
शंकर पाहिले दूरचे दूर । भिलणीचं हरसलं मन ।
तिनं शंकर देखला । धुनी घालून बैसला ।
गेली शंकराजवळीं । तिनं गायन मांडिलं ।
तिचं मंजुळ ऐकून शानी । नेत्र उघडिलं शिवानीं ।
शिव पाही नेत्र उघडून । भिलणीचं चांगुलपण[4] ।
शंकराचें हरपलें मन । करी भिलणीशीं भाषण ।
तूं हाईस कुणाची कोण ! वन्नाची भिल्लीण अज्ञान ।
मी आलें तुमच्या कारण । शंकराचें हरसलें मन ।
मांग म्होर नाहीं कोण । आपण होऊं ग गोसावी

१ क्रोध. २ मन खंबीर केलें. ३ वेष. ४ सौंदर्याला. "चांगुलपण" हा शब्द नेहमीं वापरला जातो.

**शिवशंकर चैतान झाला । हात भिलणीवर टाकला ।**
**सोड सोड झिंझाडा दिला । भिल्ल हायत साठ वनाला ।**
**मारत्याल आपल्या दोघाला । हातांत घालून हात ।**
**भिल्लीण करी भाषण । वाईट तुमचे गुण ।**
**पारवतीसारखें रत्न । तुम्ही आलेत टाकूनशान ।**
**दोघांचा मनोरथ पुरला । बेस भिल्लणीचा टाकला ।**
**पारवती उभी शिवाला । निघून गेले कैलासाला ।**

( चांभार स्त्री-पुणें जिल्हा )

" गंधारीचा वसा " हें गाणें महाभारतांतील कौरव पांडवांच्या भाऊबंदकीमुळें कुंती व गांधारी या जावाजावांत आलेल्या वितुष्टावर आधारलेलें आहे. " मानसगीत सरोवर " या पुस्तकांत श्रीकृष्णाबाई गाडगीळ या कवियित्रीनें या प्रसंगावर कथागीत रचलेलें आढळतें. सुलप्राप्ति होण्याकरतां कृष्ण कुंतीला गजगौरीव्रत करण्यास सांगतो. हस्तनक्षत्राच्या प्रारंभीं आश्विन महिन्यांत मातीचा मोठा हत्ती करण्यास सांगतो व सोळा दिवस त्याची पूजा करावयाची असें सांगतो. गांधारी तें ऐकते व तीच आपल्या शंभर मुलांकडून माती आणवून हत्ती करते व त्यावर बसून वाजतगाजत जाते व वाणें देते. कुंती कष्टी होते. आपल्याला हें कसें जमणार ? पण तिच्या कष्टाचें कारण जाणून अर्जुन व भीम इंद्राकडे जावून प्रत्यक्ष इंद्राचा ऐरावत मागून आणतात.

अशिक्षित स्त्रियांनीं हें गीत रचतांना त्यांत अतिरंजितता आणलीच आहे. गांधारीला कुंतीचा अपमान करावयाचा असतो म्हणून ती डाव्या पायाच्या अंगठ्यानें तिच्या दरवाजाला कुंकू लावते.

## (९) गंधारीचा वसा

**कळ नारदाची खोटी[1] । तीन ताळाच्या[2] तळवटीं[3] ।**
**सोन्याची बिघडली भटी । राजअंतरीं पडल्या तुटी ।**

---

१ उत्तान. २ त्रिताळ = स्वर्ग, पृथ्वी व पाताळ. ३ खालच्या भागांत.

कस्तुरींत पडली हिंगाची चिठी। वडील गंधारी धाकली कुंती।
म्होरं लागलं अस्तनापूर। तिथं कांहीं कैराव चतुर।
तिथं नांद कैराव चतुर। बंधु एकागळ शंभर।
दुष्ट या शंभराची नदर। त्यानीं काय बसून केला विचार।
नाहीं पाहिलं दूरवरी। आतां गेली वोसून गंधारी।
मर्तकीचा[1] बनविला हत्ती। त्याला काय बनवलं सुती।
रंग दिला भवयागती। जशीं काय चित्रं काढलीं भिंतीं।
लंबी सोंड त्याला शोभती। गळ्याघाट सर दोहेरी।
आतां गेली वौसून गंधारी। हत्तीवर घातली अंबारी।
अंबारीला खांब सोनेरी। सोन्याच्या टिका चमकती वरी
गंधारी बसुनी हौद्यांत। वानं[2] देती नगरनारीला।
जाती कुंतीच्या वाड्याला। डाव्या पायाच्या अंगठ्यानं[3]।
तिनं दरवाजा कुंकु लाविलं। शेजेच उसनं सवाल देणं[4]।
नाहीं दिला तिच्या प्रभु झाला ऊन।
वंसा घ्या तीळगुळ। वसा काय पुसुन भातली कळ।
कळ उत्पन्न केली खरी। आतां गेली वौसून ही गंधारी।
कुंती बोल धाव श्रीहरी। आतां गेली वौसून गंधारी।
भिवबा बाहेरूनी आला। माता कां तुझा चंद्र कोमेला।
माता भिवबाला बोलती। आग लागो तुझ्या चंद्राला।
आतां गेली वौसून गंधारी मला।
भीम म्हणे झाली शिमा[5]। तिच्यावरून हत्ती आणीन मी दिमा[6]।
भीम गेले जमुनास्थळीं। तिथं काय जाऊन डँगरी[7] ढासळली।
बंद झाली कैराव आळी। वाट मिळेना झाली हरळी[8]।
चिकलाच बनविल गोळं। चिकलाची गोष्ट नाहीं बरी।

---

१ माती. २ वाण. ३ अपशकून किंवा अपमान करण्याकरता डाव्या पायाच्या अंगठ्यानें कुंकू लावते. ४ शेजारणीचें उसनेंदेखील परत करावयाचें असतें. ५ सीमा = हद्द झाली. ६ डीम = ठमकारा. ७ मोठ्या आवाजांत. ८ हरळ = मोठा चर.

आतां गेली वौसुन गंधारी ।
सडसुंध बनाचा बनाविला । भीम इंगुन वरती गेला ।
इंद्रजिताला रामराम केला । इंद्र थरथरा कापला ।
भीम कांहो येणं केलं । हत्तीकारण येणं केल ।
हत्ती डांबेशीं बांधला । हत्ती दुरून दाविला ।
त्यांनीं धरून आणिला । साज मारीला बगलेला ।
हत्ती डोईवरी घेतला । मेघ होऊनी वरनं आला ।
कांचबंदी अंगणांमधीं । मातानं आटा केला ।
साजासकट हातीं झेलला ।
भीमा म्हणे झाली शिमा । माता कसा ग झेलीला
माता म्हणे भीमायाला । नऊ महिने वागवीला ।
पांच ज्योतीच्या पंचोत्रीनं । मातेन भीमाला ओवाळला ।
हत्तीवर घातली अंबरी । अंबारीला खांब सोनेरी ।
सोन्याच्या कडा वरी ।
कुंती बसून हौद्यांत । वाण काय देती नगरनारीला ।
वाण देती नगरनारीला । जाती गांधारीच्या वाड्याला ।
डाव्या पायाच्या अंगुठ्यानं । तिनं दरवाजा कुंकू लाविलं ।
शेजेचं उसनं सवाई देणं । नाहीं दिला तेच्या प्रभु झाला ऊन ।
वसा घ्या तीळगुळ । वसा काय पुसून मातली कळ ।
कळ उत्पन्न झाली खरी । आतां गेली वौसून ही गंधारी ।

(चांभार स्त्री—पुणें जिल्हा)

श्रावणाची कथा खालील गाण्यांत आहे. आईबापांना काशीयात्रा घड-विण्यासाठीं कावडींतून पाणी नेणारा श्रावण झारी पाण्यांत बुडवीत असतांना दशरथाच्या बाणानें मृत्यु पावतो व तें समजतांच आंधळे आईबाप पण आत्महत्या करून घेतात.

---

१ सडा = नाडा. २ चढून. ३ इंद्राचा ऐरावत. ४ कांचेचे तुकडे बसाविलेली जमीन. ५ पंचारती.

श्रावणाच्या कथेंतील शोकरस साध्याच पण यथार्थ भाषेंत वर्णन केला आहे. आईबापांना कावडींत घालून श्रावण निघाला, तों वाटेंत पुढील संकटाची ग्वाही देणारे अपशकून घडले. मांजर आडवें गेलें. जळणाच्या मोळ्या वाटेंत भेटल्या, सापाचं वेटोळ वाटेंत लागलं; राक्षसिणी पीठ कांडीत होत्या. श्रावण पाणी भरायला जातो तेव्हां परत वाट सांपडावी म्हणून खुणा करीत, धोंड्याच्या लगोऱ्या रचीत, गवताच्या विटी वळीत जातो. दशरथ राजा त्याच खुणांनीं बरोबर वाट शोधतो पण प्रत्येक वेळीं श्रावणाची आठवण होऊन रडतो हें कल्पना चित्र शोकरसाचें साधें पण सुंदर चित्र आहे. प्रत्येक गाण्यांत मानव्याचा आलेप आहे. सून सासूचें बरें कधीं चिंतणार नाहीं ही प्रथा लक्षांत धेऊनच श्रावण बायकोला आई-वडिलांना पाणी तापवायला वगैरे सांगतो तेव्हां ही सुनबाई सासुसासऱ्यांना नदींत बुडवा म्हणून सांगते.

## (१०) श्रावणाची कथा

वसुदेव पायानं पांगळा ।
रुपीण[1] डोळ्यानं आंधळी ।
अर तूं सरावण्या[2] बाळा ।
आम्हाला काशीला न्यावं ।
सरावण तेथून निघाला ।
गेला सुताराच्या वाड्या ।

श्रावण—

" अर तूं सुतार भैतर ।
माझा मैतार होशील ।
कावड करून देशील ।
आईबाप नेयाचे काशीला । "
कावड करून बा दिली ।
कावड घेतली खांद्यावरी ।
आला आपल्या वाड्याला ।

श्रावण—

" अग तूं सावित्री अस्तुरी ।
कर ग बुंती[3] न भाकरी ।
माता न्हाऊन घालावी ।
पित्याला अंघुळ घालावी ।
आईबाप न्यायचे काशीला । "
सावित्री कायच बोलली ।

सावित्री--

" दोहोंची मोटली बांधावी ।
नेऊन नदीला सोडावी । "
सरावण काय च बोलला ।

---

१ रुक्मिणी. २ श्रावण. ३ कालवलेला दहीभात.

श्रावण—

" अग अग तूं पापिणी ।
होशील वनीची वाघिणी ।
होशील टेकीची[1] बाभळ । "
पेटीवल्या कातीव चुली ।
माता न्हाऊं जी घातली ।
पित्या अंघुळ घातली ।
सरावणानं अंघुळ अष्टुण[2] केलं ।
सरावण भोजन जेवला ।
माता जेवूं जी घातली ।
पित्याला जेवूं जी घातला ।
दोघं कावडींत बसवली ।
घेतली चवरंगी झारी ।
कावड घेतली खांद्यावरी ।
निघाला वाड्याच्या बाहेरी ।
सरावण काय तो बोलला ।

श्रावण—

" अग तूं रुपिणी ग माता ।
मला मोठा सकुन[3] झाला ।
आडवं मांजर ची गेलं । "
तेथून म्होरच निघाला ।
आडव्या जळणाच्या मोळ्या ।

श्रावण—

" अर तूं वसुदेव पित्या ।
मला मोठा सकुन झाला ।
आडव्या जळणाच्या मोळ्या ।"
निघाला येशीच्या मारगीं ।
एक वनं वलांडिलं ।
दुसऱ्या वना सापासर्पाचं वेटोळं
तेबी वन वलांडिलं ।
तिसरं वन बा दारुण
वाघ डरक्या फोडीत ।
तेबी वन वलांडिलं ।
चवथं वन बा दारुण ।
राक्षिणी[4] पीठ कांडीत्या ।
तेबी वन वलांडिलं ।
गेला पांचव्या वनाला ।
माता कायच बोलली ।

माता—

" आम्हाला पाणी तूं पाजव । "
तिथं एक इरक्ष्याचं[5] झाड ।
कावड त्याला अडकीविली ।

श्रावण पाणी आणण्यास जातो—

घेतली चवरंगी झारी ।
निघाला तळ्याच्या मारगी ।
ठाके[6] झाडाला घालतो ।
खुणा वाटनी करीतो ।
खळोखळा जी रडतो ।
लगुरी धोंड्याच्या रचीतो ।
खुणा वाटेनीं करतो ।
खळुखळा जी रडतो ।
विरी गवताच्या वळीतो ।
गेला तळ्याच्या पाण्याला ।

---

१ टेकडीवरची. २ अष्टांग ज्ञान. ३ अपशकुन. ४ राक्षसिणी. ५ वृक्ष. ६ ठोके.

**दशरथाच्या बाणानें श्रावणाचा मृत्यु—**

झारी त्यानं बुडविली ।
झारी बुडबुडा जी वाजली ।
दशरथाच्या कानीं आवाज गेला ।
त्या बाणाई[1] सोडीला ।
सरावणाच्या उरीं वो लागला ।
सरावण 'राम राम' बोलला ।
दशरथ काय च बोलला ।
"ईकतं[2] मनुष्य बा गेलं ।
रामराम कोण च बोललं ।"
जवळ जाऊन पाहूं लागला—
"अर देवा सरावण भाचा म्यां मारीला ।"
बाण काढाया लागला ।
सरावण काय च बोलला ।
"बाण माझा काढूं नका ।
तिथं एक ईरक्ष्याचं झाड ।
तिथ माझा मायबाप ।
त्याला पाणी जी पाजावं ।
मग माझा बाण काढावा ।"
दशरथ पाणी नेतो—
घेतली चौरंगी झारी ।
निघाला कावडीच्या सुधी ।
ठोक झाडाचं बघीतो ।
खळोखळां तो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
विटी गवताच्या बघतो !
खळोखळा वो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
लगुरी धोंड्याच्या बघतो ।
खळोखळा वो रडतो ।
"सरावण भाच्या तुझा खेळ ।"
आला कावडी जवळीं ।
मातेच्या तोंडा झारी लावीतो ।
कोण आहे म्हणून बोलूं लागली
दशरथ रडूं बा लागला ।
"काय सांगू बाई तुला ।
सरावण भाचा म्यां मारिला ।
कुंकू लेकीचं पुसलं ।"
मग आई बाप पाणी पिईनात
आईबाप दोघेही स्वतःला मारून घेतात.

कावड त्यानं उचलली ।
नेली तळ्याच्या पाऊला[3] ।
काढला सरावण्याचा बाण ।
माईनं मारून घेतला ।
बापानं मारून घेतला ।
तिघेची तिघे मरण पावले ।
तोडले चंदन हे वेल ।

---

१. बाण (गाण्यांत जमण्याकरतां ई जोडली) २. इतके ३. कांठाला.

त्याला दिले आगीन वाट । दशरथ रडूं वो लागला ।

"सरावण भाचा म्यां मारीला। कुकू लेकीचं पुसलं। "

सखूबाईचें गाणें हें अधिकच गद्यात्मक आहे. पाण्याला गेलेली सखु देवाच्या ध्यानानें बुवाच्या बरोबर पंढरीला जाते. सासू व पति तिला हाणून मारून आणवतात व कोठडींत बांधून ठेवतात. सखु भगवंताचें ध्यान करते. रात्रीं देव येतो. कुलुप कासरें गळून पडतात. देव ते स्वतःस बांधून घेतो व सखु पंढरपूरला देवापाशीं जाऊन आपला प्राण सोडते. पंढरपूर कष्टसागरांत बुडून जातें. म्हणून रुक्मिणी अमृत शिंपून सखूला जिवंत करते व तिची घरीं चोळीपातळ देऊन बोळवण करते. सासूसासरा, पति तिला धन्य मानतात.

## (११) सखूबाईचें गाणें

आकेडमासीं[2] एकादशी बुवा चालले पंढरीशीं ।
ब्राह्मणाची सखुबाई गेली होती पाण्याशीं ।
त्या पानंदी[3] बुवांनीं पुंगीचा नाद केला ।
सखुबाईला ध्यानं लाविलं देवाचं गंगेवरी ।
घागर ठेवूनी सखु निघाली पंढरीशीं ।
सखुबाईच्या सोबतिणी घरीं आल्या सांगत सासूशीं ।
सून सखुबाई तुमची गेली पंढरीशीं ।
सखुबाईच्या सासुला राग आला जाऊनी सांगती पुत्राशीं ।
हातांत काठी लागे पाठीं सखु अडविली रस्त्याशीं ।
हाणून मारून सखु आणली घराशीं ।
दोर लाविला खोलीमधीं कोंडून टाकली ।
सखुला बांधूनीं लावली कुलपी महामोरी[4] ।
अरे भगवंता कमळीकांता दिवस होता निवून गेला ।

---

१. श्रावण हा दशरथाचा भाचा होता. बहिणाच्या मुलाला भावाची मुलगी देण्याची प्रथा महार, मराठा वर्गांत सर्रास आहे. २ आषाढ महिन्यांतील. ३ पाणोथ्यावर. ४ मोठी.

(२०) साजण की मतवाली । कुण्या नयनाची सुध गेली ।
शेक सलाल की । बाप दलाल की । गजरा भर मला ।
गुलाल की ।

फळाफुलांचा मळा, त्याचा माळी आणि मळ्यांत येणारे राघू–मैना हा लोकगीतांचा एक आवडता विषय आहे. मळ्यांतल्या फुलांचे गजरे करून स्त्रिया आपल्या केसांत माळतात आणि राघू–मैनांचीं चित्रें आपल्या चोळीवर भरून घेतात...

(२१) गांवाला ग गेला कुण्या याचा घोर नाहीं मला ।
माळीणबाई ग मळ्यांत काय ग ।
झाडावरला राघू तुला बोलला काय ग ?
अंजीराचं फूल तुझ्या बागेंत नाय ग ।
झाडावरला राघू तुला बोलला काय ग ?
माळी मळ्यांत, देव तळ्यांत, चाफी वनांत मोगरा ।
माळीण गुंफती तुरा ग राजीगरा काय कोथमिरा ।।

(२२) माळ्याच्या मळ्यामधीं शेकांची[1] जाळी ।
शेकाच्या जाळीमधीं राघूचा मेळा ।
राघूच्या मेळ्यामधीं मैनाचा गळा ।
तूं फिर पगडीवाला । पगडीचा मोंगलतारा ।
हालुपिला शिविली चोळी । वनविला डेरा ।।
माळी मळ्यामधीं लिंबू तळ्यामधीं चाफकळ्यामधीं मोगरा
माळीण गुफी तुरा राजगिरा काय कोथमिरा ।।

आपल्या गांवांतील स्थानिक गोष्टी, बाजार, स्थळें, पाणोठे, देवदेवता यांचे उल्लेख जसे जात्यावरील ओंव्यांतून येतात. तसेंच घणावरील या गीतांतूनही येतात—

(२३) गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।
इंद्रापूर शहर दिसतं गुलजार ।

---

१. शेपा वनस्पति.

बहु किरण[१] येतो फार मुंबईवर ।
मुंबईची उत्पर[२]देवी डोंगरावर ।
दिवाणच्या बया गोरा साहेब ।
साहेबाच्या न बंगल्यापुढं कारंज उडं
बिन बैलाहून गाडी पळ इंग्रजी कळ ।

(२४) बिन बैलाची गाडी पळ इंग्रजी कळ ।
पंढरपूर खालीं सोलापूर ।
सोलापुरची मुंबादेवी डोंगरावरी गिरणीची हवा
तिथं नांदत भगवानबुवा ।
सहाजणी सया गोरसमर्या[३] ।
त्याच्या ग बंगल्यापुढं कारंज उडं ।।

(२५) गंगा वो जम्ना जम्नाची बानुबाई बेगडी मैना[४] ।
जम्नाचं पाणी रमणा बेगडी मैना ।
मैनाची बानुबाई मोती लेईना ।
तुरा गुफीला सात पदरी भाग नगरीं ।
सातारा गडावरी ग रावा तो बोलला ।।

(२६) माडीवर माडी माडीवर बंगला । खाली पाऊस
थुईथुई रमला ।
शालू भिजला । एका गोठीनं[५] अंतर पडला ।
चिमनाहीं तुजला । नका जाऊं मुंबईला ।
लागलाय पाणी रान दिसतय भेसुरवाणी ।
बडोद्याचा रंग न्यारा सुरतीचा मुक्काम केला ।।

(२७) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला ।
अग होळी होळी[६] पुणें शहरांत गर्दी झाली राहुटी दिली ।

---

१. सूर्यप्रकाश. २. उत्पल=कमळ मुंबईच्या लक्ष्मीच्या एकाद्या देवळाला उद्देशून असावें. ३. दूधवाल्या ४. विशिष्ट स्थानिक दैवताला उल्लेखून. ५. गोष्टीमुळें. ६. आवर आवर.

पुणं घरावर[1] उडतो रंग। शिरीं मंदील तुरा त्याला
शोभतो याला ।।

देवादिकांवरून व पुराणप्रसंगावरून गाइलेलीं गीतेंही आहेत. पुष्कळदां त्यांत स्थल-कालाचे गोंधळ असतात. यांतील बरींच गीतें कृष्णलीलांवरून गाइलेलीं असतात.

(२८) सोड हरीला हरीला। पदर धरीला धरीला धरीला।
कशाचं शहाणपन। हात घाली गळ्याच्या सरीला।।

(२९) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला।
त्याच्या संगतीला देव मारवती गेला।।
झिर मिर जिर कापुरी हिरा।
गवळण भली। कृष्णाला झोंप लागली। निघुन चालली।
हरी मथुरेचा विडा लवंगाचा। चुडा भिंगाचा।
काय थाट गवळणिचा। पदर जरीचा ग पदर जरीचा।
दही घ्या दही ह्या दह्याची धार काय ग उभी राधा।
कृष्ण तोलून पाह्य। म्होर जाय।।

(३०) अशी गेला कोण्या गांवा याचा घोर नाहीं मला।
त्याच्या संगतीला देव मारवती गेला।।
कशी माडीवरती माडी त्याला चंदनाची शिडी।
गवळण वेडी कृष्ण गारुडी ग गारुडी।।

(३१) कडकडीत दडदडीत वीज लवली। जम्नागिरी गाया
चारीतो।
यश्वदेच्या बागेमधें पावा वाजतो। गाया चारीतो।
आगाशीं बिजवा[2] लवतो। त्यांतमधीं राघू बोलतो।।

(३२) गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला याचा घोर
नाहीं मला।
राजमंदिरीं झोंपेच्या भरीं। लक्ष्मी घाली वारा।

१. पुरंधर किल्ला. २. बिचवा.

सर्वा श्रृंगार गवळणीचा। विडा लवंगाचा। चुडा भिंगाचा।
शिरीं माठ गवळणीचा। पदर जरीचा पिवळ्या रंगाचा।

(३३) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला ग।
गांवी घरा घरा या कृष्णाला पाण्याच्या वाट चेंडू
खेळतो रस्त्याला।।

(३४) चाल गोरे चाल कान्हा खेळतो गुलाल।
असा दर्‍या खोल याचं पाणी मोठं गोडं[1]।
सभेला पाणी गेलं राजानं नवल केलं।।

(३५) गौळणी गौळणी श्रीकृष्णानं नाच केला घागरी बांधुनी।
चाल गडे चाल माझ्या दादाची चालणी।
मखमली बोल याची पारोशी बोलणी।

(३६) चौघी गेल्या चहूकोनीं। मधवी गेली टाकोनी।
रवीच्या नादाखालीं। लोणी गेलें विधरोनी।।[2]

(३७) पगडी ग वरती लाल तुरा सभी कोथमिरी[3]।
भरला मथुरेचा बाजार झाली दोपार।
हरी भेटल ग भेटल वाटेवरी।
कसा जाऊं देईना तरी ऐक श्रीहरी।
गोष्ट नाहीं बरी मस्कर्‍या हो करी।
आम्ही सासुरवाशिणी नारी जाच लभी भारी जातों
माघारीं।।

पंढरपुरांतील कृष्ण–विटोबा हाही गीतांचा लोकप्रिय विषय असतो...

(३८) हौस मला मोठी पंढरीला जायाची। वाळवंटीं राह्याची
चंद्रभागेला न्हायाची[4]। उभ्या रस्त्यानं जायाची।
आबीर बुक्का घ्यायाची। विठ्ठलला न्हायाची।।

---

१. किंवा तिसरी ओळ... "आला ग आला बाई गंगनीं गर्जत!"
२. हा एखादा उखाणा आहे कीं काय असें वाटतें. ३. कोथिंबिरीसारखा बारीक नक्षीचा. ४. वहाण्याची.

(३९) जरी बुका कीं मूठ मूठ फेका। जागोजाग विठ्ठलाच्या चरणीं लागा।
पंढरी बघा हरी ग पंढरी बघा ॥

(४०) मूठ मूठ बुका कीं मूठ मूठ फेका। हरी बाओी माझ्या सख्या वरी।
गांवाला गेला गांवधरी। माघारी पाहीना घराकडी।
संपत माझी शेला पुरी। रानींवनीं मला लावूं नका।
जिवलग माझा प्राणसखा।

एका गीतांत सीतेचा शोध लावणाऱ्या मारुतीचा उल्लेख आहे...

(४१) सखु सजणी ग रावण घरीं नाहीं सुकली जाओी मनमोहना।
राज सगळा ग लंकेला लावी ध्वजा मारवती राजा ॥

एकएका देवाच्या नांवानें एकेक घण मोजायचा व मग तेलवण पाडून नवरा नवरीला तेल-हळद लावायची या प्रथेचा उल्लेख खालील गाण्यांतून आहे, मरीआई, लक्ष्मीआई, म्हसोबा, खंडोबा, बहिरोबा हीं या स्त्रियांचीं दैवतें...

(४२) घणु बाओी घणु साता पुडियाचा घणु।
मरी आओी घरीं सोंवळं। आयबा[1] घेती वाण।
घणु बाओी घणु साता पुडियाचा घणु।
बहिरोबा घरीं सोंवळं आयबा घेती वाण।

(खंडोबा, विठोबा वगैरे देवतांचीं नांवें घालून हेंच गाणें वाढवितात)

(४३) घणु बाओी घणु आणती घणु बाओी घणु।
पांच सवाष्णींचा घणु आणती घणु बाओी घणु
तेलवण पाडूं तेलवण पाडूं।
मरीआई घरीं ग लगीन आणती घणु।
लक्ष्मीआई घरीं ग लगीन आणती घणु।

---

१. अहब = अविधवा = सवाष्ण स्त्रिया.

**गोपिनाथ घरीं ग लगीन आणती घणु ।**
**तेलवण चढूं आधीं नवरदेवला मग नवरबाओीला ।**
**तेलवण चढूं आधीं म्हसूबारायाला मग मांगीरसाहेबाला[1] ।**
**तेलवण चढूं आधीं मांगीरसाहेबाला नवरदेवाला मग नवरीबाओीला ।।**

पुष्कळ गाण्यांतून अनेक विषय एकांतच येतात. त्यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नसल्यानें गाणें असंबद्ध वाटतें. स्वर आळवायला बसलें कीं पुष्कळदां शब्दावरून नवी कल्पना सुचते व तो नवा विषयच आळविला जातो...

(३४) **गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।**
**चंदाखाली बंदाखाली मखमली डेरा दिला[2] ।**
**रात्रींच्या ग चांदण्याला सखा माझा बंधु गेला । चंदाखालीं बंदाखाली**
**गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।**
**माळयाच्या मळयामधीं जाओीचं झाड । कळयाचा भार । तोडिती नार ।**
**गुफिती हार । याची नवती डौलदार । जानीचा भार ।**
**गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।**
**कडकडी कीं धोतरजोडी । काळी पगडी । हातीं अंगठ्या दंडपेट्या ।**
**खाली काय घसाची भिकबाळी ।**
**गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।**
**हिरवी चोळी मला । टिका बसविल्या त्याला । भिंग बसविलीं ठासून ।**
**चोळी आणली ग सद्गुरुपासून ग हरी बसून ॥**

---

१. मांगीरसाहेब हें एक स्थानिक दैवत असावें. २. चादण्यांत मखमली तंबू ठोकला.

(४५) गांवाला ग गेला कुण्या गांवाला ग गेला ।
याच्या मैतरच्या जोड्यां[1]...चंदाखालीं बंदाखालीं मखमली
डेरा दिला ॥

नार नक्कदार[2] कुकुलिली[3] अनिवार चंदाखाली...
भरल्या बाजारांत मला हातानं पालविली ।
हातानं ग पालविली माझ्या बंधवानं चोळी घ्यायला
बोलाविली चंदाखाली......
चंदनाच पाट मी टाकिलें ठायीं ठायीं ।
पोथी वाचायला यावं माझी विठाबाई...
बंदाखाली बंदाखाली

(४६) गांवाला ग गेला कुण्या दाजीबा दिरा मोत्याचा तुरा ।
शिपी गेल्यात रहिमतपुरा माघारी फिरा ।
गांवाला ग गेला कुण्या साताऱ्या गडावरी ।
राघोजा दारीं चोचीनं पाणी सारी दारकावरी ।
फुल पडलय चंदरपुरीं करिती धावा ।
बानुला नेती केव्हां कानड्या देवा[4] ।
गांवाला गेला कुण्या सोन सौगडीला ।
अजून पाणी येईना नेई नर्मदेला राजा तान्हा जरा ॥

(४७) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला ।
त्याच्या संगतीला देव मारुती गेला ।
दाजीबा दिरा बाजारीं चला ।
लागली तहान खंदावा झिरा ।
ऐन वनामधीं माळ्याचा मळा ।
जाईचं झाड कळ्याचा भार ।

---

१. मित्रमित्र जोडीनें. २. नखरेबाज अशी भावाची स्त्री. ३. कुंकु ल्याली. ४. स्थानिक दैवत बानु व त्यावरील दंतकथेला उद्देशून सज्जनगडावरील ही दंतकथा आहे. ५. झरा.

तोडीती नार गुफिती हार । सुरत अनिवार चंद्राची कोर ।
सईबाई जानीचा भर ।
हरी उभाच उभा वाटेवरी कसा जाऊं देईना हरी ।।

(४८) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला ।
त्याच्या संगतीला देव मारवती गेला ।
चला जाऊं आळंदी गांव पाहूं दवणा वाहूं ।
दवण्याची काय हवा शंभुदेवा ।
शंभूच्या शिखरावर बोल रावा ।
वामनाची द्रुपदा जितली त्यांनीं पांडवांनीं
यम्ना जम्ना जम्नाचं लाल पाणी किल्यामधीं
हरहर बोला ।
गंगेला पुर आला पाह्या गेला सांगते सांगड्याला
पेटी घाला प्राण गेला ।

(४९) गांवाला ग गेला कुण्या गांवाला गेला ।
घडी घाल घडी घालावी सोयऱ्यादादा चुडं लाल ।
तुझ्या चुड्याची काय र हवा शंभूदेवा ।
शंभूच्या शिखरावरीं नामनामी ।
द्रुपदा जितली त्यांनीं पांडवांनीं ।
नीट बसावं सारंगपाणी सोनार घडूघडी ।

(५०) अशी गेला कुण्या गांवा याचा घोर नाहीं मला ।
त्याच्या संगतीला देव मारवती गेला ।।
साजणी साजणी चिंतामणी । हिरव्या बनातीचीं
मी यजमानिणी
राजाचा सुटला घोडा दरव्याला पडला वेढा ।
यमुना का जमुना मधें टाकिला डोल ।
पाणी हलना कां खिलना हरणी चाल चाल ।
नवरत्नाचा हार त्याला मोती चार–चार ।

आमुचा मुलुख वाण्याचा आमची बामणी बोली।
हातीं सोन्याची झारी पाणी पाजवा नारी ।।

(५१) इटल इटेवरी रुख्मीण रावळांत।

तिथून कथा होती दोघांचं एक चित्त, ( हें ध्रुपद म्हणून अनेक गाण्यांच्या आरंभीं म्हणतात )

कडकडीत दडदडीत। वीज लावली शहापुरीं।
शहापुरीं जम्नागिरी।
गाया चारितो। आला ग आला ग बाई गगनीं गर्जत।
खिडकींतून माडींतून। कोण ग बघतो। लटका माझा
सावकार चंद्र झुलतो।
भांडूं नका तंडूं नका तुमची तुम्हांला। पदरचा पैसा देतें
झेंडू फुलाला ॥

एक पैसा दोन पैसा केसरी गुलाब।
असा दर्या खोल याचं पाणी किती गोड।
सभेला पाणी गेलं राजांनीं नवल केलं ।।

घणावरील खालील गाणें एक स्वतंत्र लोकगीत आहे. लहान मुली भावलाभावलीचें लग्न लावतात. आणि खऱ्या लग्नांतील सारे विधी लुटपुटीच्या आपल्या समारंभांत घडवून आणतात त्याप्रमाणें वनस्पतींच्या एका लग्नसमारंभाचें चित्र या गाण्यांत रेखाटलें आहे.

परसॉनिफिकेशनचा अलंकार सर्वत्र उठावदारपणें उपयोगिला आहे. वड मोठी असून बोलावणें नाहीं म्हणून रुसते तर रामफळ जाऊनही तिला कोणी विचारणार नाहीं. बोर कुरवली होते, तर नागिलीचा भाऊ म्हणून मोठा मान. सगळ्या वनस्पतींचीं नांवें गाण्यांत आलीं नसलीं, तरी त्यांना आमंत्रणें गेलेलीं आहेत.

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

(५२)

गांवाला ग गेला कुण्या हलहलकडी कावडिया चाल ।
चमकती गळ्या दुलडी विजपरी लाल । गोंडे चुनडी दंड
किती बोल नापका फूल झपंका[1] । जांबजांभळी विचार करीती ।
नारंगीची करूं लग्न
अंजीर नवरा वर पाहिला । वनस्पतीला या घेओनी ।

वड म्हणे आम्ही मोठमोठाल्या आम्हाला नाहीं आली चिठी ।
नको ग जाऊस रामफळी उगच होशील खटी ।
हात हात दाढी लांब लांब मिशा ।
मनीं बांधून कंबर । मांडव्यांत येऊन बसलं हळुंहळुं तें उंबर ।

पन्नास आंबा म्हण नांदुंकी[2] । शिरसं[3] बसले सभेसी ।
भरुनी लेखणी लिहुनी पत्र पाठवा वनस्पतीला ।
अंजीराची लग्न काढिली जल्दी या तुम्ही लग्नाला ।
केकतड[4] म्हणे जाग रांडानो मनीं सोडिल्या लाजा ।

मी आलें असतें पण पति धाडना माझा ।
एकळ[5] टांकळं भांडत होती संवद्‌डं[6] समजावी प्रीतीनें ।
बोर कुरवली आली धावुनी कवठ बसली न्हायाला ।
नागील म्हणें जाग रांडांनो तुम्हांला पुसतय कोण ।

मांडवाच्या दारीं आहे भाऊ माझा मान ।
पेरु गुलाबी येईल मुऱ्हाळी मग मी जाईन ।
गुलतुऱ्यानं तुरा गुफीला कण्हेर बेटा भिकारी ।
गुलतुऱ्यानं तुरा गुफीला झेंडूचं फूल बराबरी ।

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

---

१. झुपकेदार २. नांदरुकी हें एक मोठें व दाट छायेचें झाड आहे. ३. शिरस = शिरीषवृक्ष किंवा एक प्रकारची मोहरी. ४. घायपात. ५. एकळी = एक काटेरी झुडूप. टाकळ = एक औषधी झुडूप. ६. संवद्‌ड = शमीवृक्ष.

## रुखवत

रुखवत हा लग्न–समारंभांतील एक महत्त्वाचा भाग असतो. मुलीकडील माणसें वराकडील मंडळींसाठीं रुखवतासाठीं निरनिराळे पदार्थ घेऊन जातात. रुखवताचे वेळीं विहिणी–विहिणी या महत्त्वाच्या व्यक्ति असतात. रुखवतांत केवळ खाद्यपदार्थच असतात असें नाहीं. त्यांत कपडे, दागिने, इ. सर्व गोष्टी येतात खालील गाण्यांतून त्याची कल्पना येईल...

(५३) रुखवत आलं रुखवत आलं रुखवतांत केळीची फणी ।
उघडुन पहाती रायरुक्मिणी ॥

(५४) रुखवत आलं रुखवत आलं त्यांत होता जाम ।
रुखवत उघडायला आला फलटणीचा राम ॥

(५५) रुखवत आलं रुखवत आलं त्यांत होतं रताळं ।
उघडुन बघतात त्यांत पंढरीचा येताळ ॥

(५६) आलं आलं रुखवत रुखवतावर डबा ।
उघडुन पाहती तो राम लक्ष्मण उभा ।

(५७) आलं आलं रुखवत रुखवतावर झुबा ।
उघडुन पाहती तो पांची पांडवाची सभा ॥

(५८) आलं आलं रुखवत रुखवतावर जाई ।
उघडुन पाहती तो जानकी सीतामाई ॥

(५९) आलं आलं रुखवत अर्जुन गर्जून ।
उघडुन पाहती तो भीमार्जुन ॥

(६०) आलं आलं रुखवत मांडवाच्या दारीं उभा ।
उघडून पाहती तो भरली इंद्रसभा ॥

(६१) आलं आलं रुखवत रुखवताचें भ्यव ।
उघडून पाहते तों गोकुळचें कृष्णदेव ॥

(६२) आलं आलं रुखवत रुखवतावर सहाण ।
उघडुन पाहते अंजनीचे हनुमान ॥

(६३) आलं आलं रुखवत दणाणलं हेळ[1] ।
उघडून पाहतें राम लक्ष्मणाचा खेळ ॥

रुखवतांत आणखीहि मोलाच्या वस्तु बक्षिसार्थ आणल्या जातात. आपलें वैभव त्यांतून व्यक्त करण्याची वरमायांची हौस असते.

(६४) आलं आलं रुखवत दणाणलं पुणं ।
उघडून बघतें सुपभर सोनं ॥

(६५) आलं आलं रुखवत दणाणली बारामती ।
उघडून बघतें सुपभर मोती ॥

(६६) आलं आलं रुखवत दणाणली मंमई ।
उघडून बघतें सोन्याची समई ॥

(६७) आलं आलं रुखवत दणाणलं जोतं ।
उघडुन बघतें साखरेचं पोतं ॥

(६८)

आलं आलं रुखवत आंत होता आंबा ।
रुखवत उघडते कुणाची रंभा ॥

रुखवतांत किती प्रकारचे पदार्थ केले जातात त्याची कल्पना खालील मोठ्या गाण्यांवरून येईल. एका चांभार स्त्रीनें गाइलेलें हें गाणें आहे. लग्नांतील धांदल गाण्यांतून स्पष्ट झाली आहे. क्रिया व्यक्त करणारें साधेंच पण समर्पक असें तें गाणें आहे. नखुल्या झुरळ्या या प्रकारांची आतां आपण नुसतीं नावेंच ऐकतों.

(६९)

सुकून वड घाली गंगा । भागीरथीशीं जाऊन सांगा ॥
यमुनासी परत मागा । तिंबायाशीं[2] ॥

---

१. हेळ किंवा हाळ = डोंगरावरून वहाणारा ओढा व त्याचें खडबडीत पात्र.
२. काणिक तिंबण्याकारितां.

काशी घेउनी घागर । शिपर शिंपीती नागर ॥
नका जाऊं बनारशीं । दिवा ठेवायाशीं ॥
यश्वदीनं धरली वाट । गुजाई भाजी लाही पीठ ॥
कासई म्हणती आणा सुंठ । पाहीं वाट ॥
यश्वदीनं केली करंजी । भिमानें केली पातळ सोजी ॥
नखुल[1] वळीत वसली राधी । दरवाजाशीं ॥
वायजा पापड लाटिती । भिमा वळणावं[2] घालिती ।
आणि अणारस[3] तळी । रखमाबाई ॥
कुठं दिली माझी सई । मला अजून ठावं नाहीं ॥
सखु बहिणी करावं काय ? सांगा आम्हांसी ॥
झुरळ्या[4] पाडी वर सगुणा । रुसून बसली ग चांगुणा ॥
समजाविती ग मैना । तळतळ गे बाई ॥
तुळजा आलीया धावून । हातीं लाटण घेऊन ॥
रंगी बोल धमकाउनि । बुंदी बांध ग बाई ॥
गुळाचा पाक करी राधा । निराई म्हणती गोळी बांधा ॥
जाळ घालून सुंदर सौदा । झारा फिरवुनि ॥
खिसका[5] दळी सतीभामा । ठिवला भरुनि ॥
कांडीत होती नार साळो । तिकडनं आली वया वाळो ॥
गंगी म्हणती भिरकी[6] दळो । कितीक माणसें ॥
लाडू मोडित बसली आका । तिकडनं आला मामा सखा ॥
कांग लाडू झाला फिका । पाहीं उचलोनी ॥
साती दुरड्या रुखवत । ओल्या वरातीला जात ।
गल्लोगली मिरवत । जिमनी[7] नेल्या मांडवांत ॥

---

१. नखुल्या. २. वाळण्यास घालते ३. अनारसे. ४. झुरळ्या हा पदार्थ कोणता असावा हें समजत नाहीं. ५. सांडगे कुरड्या इ.चें पीट. ६. पुष्कळ. ७. जिमनी= ?

रुखपताच्या सात दुरड्या —
पहिली दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।।
विहिणी उघडून पहात । पानसुपारी ।।
दुसरी दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।
काठो सपेटाची । विहीण झाली विठ्ठलाची ।।
तिसरी दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।।
काठोकाठ गुलालाची । विहीण झाली दलालाची ।।
चौथी दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।।
काठोकाठ अबीराची । विहीण झाली कबीराची ।।
पांचवी दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।।
नाहीं झाली माझी नेहरी । नवऱ्या देवाला गोत भारी ।।
सहावी दुरडी रुखवत । जिमनी नेल्ये मांडवांत ।।
तुपाची म्यां केळी दिली । नणदही विहीण केली ।।
सातवी दुरडी रुखवत । जिमनी नेल्या मांडवांत ।।
खालीं सोजाची काकर । विहीण झालीं एका मातेचीं लेंकरं ।।

रुखवतांत आपापल्या शक्तिप्रमाणें आपलें वैभव दाखविण्याची इच्छा दोन्हीं पक्षांना असते पण रुखवत हा विहिणी विहिणींचा एकमेकींना लग्नांतील फसविण्याचाहि एक खेळ असतो. म्हणून रुखवत उघडून पाहायला गेलें तर त्यात दीडच पोळी फक्त दिसते असलेंही एखादें विनोदी उदाहरण सांपडतें—

( चांभार स्त्री—पुणें जिल्हा )

(७०)

रुखवत आलं रुखवत आलं दणाणली आळी ।
उघडून पहाती दीडच पोळी ।।

रुखवताचे वेळीं विहिणी विहिणींनीं एकमेकींना अचकट विचकट आहाणे घालण्याची प्रथा असंस्कृत समाजांत सर्रास आहे. म्हणून विहिणीने विहिणीची टिंगल खालील उखाण्यांतून केली आहे.

(७१)

मांडवाच्या दारीं। रुखवत आलं भारी। आंत काय काय परी ।।
शेवया साजुक । तेलच्या नाजूक । हळदीच्या वाट्या ।
कुंकवाचं कुडं । उडदाच वड । शेंदी सकट पांच नारळ ।
देठासकट जायफळ । असं नांव घ्या खडाखडी ।
वर ठेवा पातळाची घडी ।।

(७२)

आलं आलं रुसवत । त्यांत होतं बक्षी गहू ।
नवऱ्याच भाऊ तिरशिंगराव। त्याला समजावितो सारा गांव
समजून घेईना घरीं । वरमायची आली नेहरी ।
घालतो सोन्याची सरी। समजून घेतो घरीं ।।

(७३)

ईवाई करिती चांदी चुंदीचा । आंखुड बांध्याचा । टिकल्या लेइना गंधाच्या ।
अंग भरलं ठायींठायीं । दारी बसलं दादाभाई ।
नवरा आला थोराचा । कमरीं करगोटा मोराचा ।
दिठ[1] झाली लालाला । काळँ लावा गालाला ।
दिठ झाली नागणीला। मिरच्या टाका आगणीला ।।

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

(७४)

आलं आलं रुखवत रुखवतांत पोव्हा ।
विहीण म्हणते मला चोळी नको लुगडें नको अन टकुचं पोलकं शिवा ।।
आलं आलं रुखवत मांडवाच्या दारीं पडली पांचाची नोट ।
विहीण म्हणते मला साडी नको चोळी नको मला विजार अन् कोट ।।

---

१. दृष्ट.

आलं आलं रुखवत आंत होती चंची ।
भाच्याच्या दागिन्याची नवऱ्याची वरमाई कोणची ?
आलं आलं रुखवत रुखवतांत नथीचा आकडा ।
इवायदादा मेला फाकडा इवाय म्हणतो बाई तुमचा एक
दांत कांहो वाकडा ? ।।

(७५)

आलं आलं रुखवत रुखवतांत जाई ।
विहिणीच्या वास्यांवर उभं राहून पाही पंढरपूर पाही ।।

(७६)

मांडवाच्या दारीं पडलं वेल ।
देव कारव्याला वकरं आणलेलं वाटेनच मेलं ।
वसाया पटकरा आणलेलं पुण्याला गेलं ।
इवाय करुन केला दलाल ।
नाहीं भांगांत मिळाला दमडीचा गुलाल ।।

खाल्या आळीला वरल्या आळीला ।
कशाचा गलबला बाई जावईबा जलमला ।
बारा हो गांवचा खालता होता एक मळा ।
नांगरुन डोंगरुन केला काला । त्यांत पेरलं जोंधळ ।
त्याच्या झाल्या पिशा पिशा ॥
जावईबोवाच्या भरल्या गोणी मिशा ॥

विहिणीला घातलेल्या उखाण्यांतून किती अश्लीलपणा येऊं शकतो याची कल्पना खालील उखाण्यांवरून येईल...यांत प्रामुख्यानें व्याही व विहीण यांच्या इंद्रियविषयक संबंधाला उल्लेखून कुचेष्टा केलेली असते. असंस्कृत मनाच्या बाबतींत अश्लीलता ही किती मोकळेपणानें येऊं शकते हें त्यावरून

---

१. नीच्या.

सहज समजून येईल. सुसंस्कृत माणसाला हे उखाणे चारचौघांत वाचून दाखविणें देखील कठिण, पण अशिक्षित समाजांत लग्नासारख्या मंगल प्रसंगांत सामुदायिकपणें एकमेकांना ते बोलले जातात.

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

(७७)

विहिणीबाई विहिणीबाई हांका मारतो बाळ्या ।
तुमच्या कां हीं मोठाल्या वळ्या ? ॥

(७८)

मांडवाच्या दारीं पडलं टिपरं । विहिणीला पोर झालं झिपरं ।
इवाय म्हणतो पोर कां हो झिपरं ?
असूं द्या दादा रात्रीं निजाया गेली होती तेव्हां नवऱ्या आलं फेंफरं
तेव्हां पोर झालं झिपरं ॥

(७९)

आडभितीला पडभीत पडभितीला कमान ।
आंत सऱ्या रंगाची विहीण मिळाली ढोंगाची ।
चटी पटी भांगाची ।
भांगभर मोती । इवायानं विहीण नेली पलंगावर रातीं ।
आम्हांला तरी काय माहिती ? पण सभेची लोक बोलत होती ॥

(८०)

व्याह्यानं विहीण होकारली कशासाठीं ?
व्याह्यानं विहीण होकारली गोठासाठी ।

---

( याप्रमाणें 'गोठ' या जागीं 'पुतळ्या', 'नथ', 'मासोळ्या', 'तोडे', 'वाक्या', 'फूल' इत्यादि सर्व दागिन्यांची नांवें घालून गाणें वाढवितात ).

हिंचे गोठ दिले हातीं हिला खोलींत नेली रातीं ।
म्हाई म्हणाल ग बायांनो खरं सांगा रे पोरांनो ।
खोली खोल ग मैना रात्रीं केवढा धिंगाणा ।
व्याह्यानं विहीण होकारली कशासाठीं ?
व्याह्यानं विहीण होकारली पुतळ्यासाठीं ।

(८१)

नथ ल्या वैनी नथ ल्या ।
तुमच्या नथीवरनं उडतीं पांखरं । उडतीं पांखरं मानदेशीचीं ।
मानदेशीचा हरी सोनार । हरी सोनार खरीद करणार ।
खरीद करणार बैल भरणार ।
बैल भरणार खोलींत जाणारणी । खोलींत जाणारणी दणकं देणारणी ।
खोली खोल ग मैना रात्रीं केवढा धिंगाणा ।
बोली बोल मैना तुझी कानडी येईना ?
येळा ल्या वैनी येळा ल्या......

( याप्रमाणें सर्व दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवितात )

(८२)

मांडवाच्या दारीं विहीण बसली मैना ।
अंगावर नऊशे रुपयांचा गहेना । लेई म्हणतो लेईना
उंबर म्हणती डेर दिलं । चाल म्हणतो चालना ।
पांचीं पक्वान्न केलं । जेव म्हणतो जेवना ।
बाई बाई करतो भोसडी वर पाहीना ।
बरं पटतं कां देऊं बटाट ?

खालील गाण्यांतून स्त्री पुरुषांच्या संभोग–क्रियेचें स्पष्ट वर्णन रुलवतांत व्याह्यावरून विहिणीला उखाणा घालतांना केलेलें आढळतें. त्यांत वापरलेली

भाषा ही॰ तमाशांत शोभणारी किंवा वापरली जाणारी भाषा आहे. लग्नासारख्या प्रसंगीं असलीं गाणीं विहिणींनीं एकमेकींना म्हणावींत हें संस्कृतीच्या अभावाचें ओंगळवाणें स्वरूप आहे. मला मिळालेलीं सर्वच गाणीं या ठिकाणीं देणें देखील योग्य वाटलें नाहीं.

(८३)

पांच रुपयांचा घेतलाय कोंबडा । पांच रुपयांचा घेतलाय कोंबडा ।

हळुंच शिगवरी येंग[1] र तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।
पांच...............

हळूंच दादर येंगव तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।
पांच...................

हळूंच पलंग येंग र तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।
पांच...............

हळूंच मिऱ्या वार र तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।
पांच...............

हळूंच टोच मार र तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।
पांच...............

हळूंच दाणा येच र तूं । भल्या माझ्या कोंबड्या कुकु च कू ।

(८४)

तूं हळुं हळुं ये ग माझी सौदागरणी । तूं कशी कशी ये ग माझी सौदागरणी ।

तुझ्या पायांत मोडला कांटा माझी सौदागरणी । ते कांटा कोण काढील माझी सौदागरणी ?

---

१. चढ.

इवायदादा काढील माझी सौदागरणी । तो कसा कसा
काढील माझी सौदागरणी ?

तो शोधून शोधून काढील माझी सौदागरणी ।

एक ना मोडी दोन नाय मोडी । तिसऱ्यानं लवंगा खोडी ।

( तिसऱ्या चरणांत 'पाया' चे ऐवजीं हातांत, टिरींत इ. सर्व अवयवांवरून म्हणून गाणें वाढवितात )

(८५)

अर दुरडीच्या दुरड्या । आणल्या ग तेलच्या । व्याही म्हणे
कालच्या विहिणीला ।

विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय । खोलीची
सुध यांनीं केलीच नाय ।

परातीच्या पराती । आणल्या पोळया । व्याही घेती चोळ्या
विहिणीला ।

विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय । खोलीची
सुध यांनीं केलीच नाय ।

परातीच्या पराती। आणला भात। व्याही धरतो हात। विहिणीचा

विहिणीचं लफडं। पोटाची धाय । सखे ग बाय। खोलीची
सुध यांनीं केलीच नाय ।

परातीच्या पराती । आणल्या ग शेवया । व्याही देतो जेवाया
विहिणीला ।

विहिणीचं लफडं । पोटाची धाय। सखेग बाय । खोलीची
सुध यांनीं केलीच नाय ।

तबकंच्या तबकं। आणलीं पानं । व्याही धरी थानं। विहिणीचीं।

विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय । खोलीची
सुध यांनीं केलीच नाय ।

तबकंच्या तबकं । आणल्या सुपाऱ्या । व्याही म्हणे दुपाऱ्यान् । विहिणीला ।
विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय ! खोलीची सुध यांनीं केलीच नाय ।
तबकंच्या तबकं । आणला कात । व्याही नेई आंत । विहिणीला ।
विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय । खोलीची । सुध यांनीं केलीच नाय ।
तबकंच्या तबकं । आणला चुना । व्याही म्हणं पुन्हां । विहिणीला !
विहिणीचं लफडं । पोटाची धाय । सखे ग बाय । खोलीची सुध यांनीं केलीच नाय ।

रुखवतांत घालावयाचे अश्लील उखाणे असे सर्रास मिळत असले तरी कांहीं सोज्वळ साधीं गाणीं मिळतात. अर्थात् अचकट विचकट उखाणे घालण्याची प्रथा कांहीं जमातींतून सरसकट आहे, म्हणूनच विचकट आणा घालूं नका म्हणून खालील गाण्यांत स्त्रीला सांगावें लागत आहे.

(८६)

रुखवत आलं रुखवतांत होतीं मक्याचीं कणसं ।
इचकट आणा घालूं नका आम्ही मरजीचीं[1] माणसं ॥

(८७)

आलं आलं रुखवत रुखवतावर लऱ्हाळा ।
विचकट आणा नका घालूं आपण चहुकून जिऱ्हाळा ॥

(८८)

आलं आलं रुखवत रुखवतावर मोर ।
विचकट आणा घालूं नका तुमच्या झिपरीला दोर ॥

---

१. किंवा " अब्रूचीं ".

(८९)

विहीण बसली न्हायाला । पाणी आणा गंगाचं । मखर बांधा भिंगाचं ।

फुलं जडा हारोहार । दूध प्यायला दोन म्हशी । दोन म्हशीला दोन टोणगे ।

दोन टोणग्यावर बारा मण गहूं । बारा मण गव्हांत चार मण हुलगे ।

इहीण म्हणती दादा इतकं कशाला ?
बाई तुझ्या लेकीला अन् माझ्या लेकाला ।
बाबा एवढं बसून खाऊं । झालझेंडा घ्यायला मांडवांत जाऊं ।।

( महार स्त्री—सातारा जिल्हा )

नवऱ्याचें नांव घेतांना अशिक्षित समाजांतील स्त्रिया मोठाले उखाणे घेतात, तसेंच व्याह्या-विहिणींच्या नांवानें रुखवतांत घेतलेले खालील दोन उखाणे आहेत !

रुखवताचे वेळीं घालावयाचा उखाणा—

(९०) उभी होते मेण्यांत । काचोळी अंगांत । गुलाल भांगांत । जायफळ ओटींत । लवंगा मुठींत । सोड ग सोड ढवळा पितांबर । कचेरीला उभे । सोन्याची किल्ली । हातीं दिली । उघडली खोली । खोलींत होती चुला । चुलीवर होती परात । परातींत होता भात । भातावर होतं तूप । तुपासारखं रूप । रूपासारखा जोडा । चंद्रभागेला पडला वेढा । रंगीत दुरडी । रंगीत सुपली । आडभीत पडभीत । पडभितीला होते गहूं । जलमले पांचजण भाऊ । एक जलमला तिरशिंगराव । एक म्हणतो बांधा भाकरी जाऊं नगराला । गाडी घेतली तासाची । बैल घेतले अणजापूर । अनजापूरचा लेहेंजा । ( काचाची झाली लैंडी । गार दौंडेंत घेतली बंडी । ) करमळ्यांत घेतला जोडा । अशी माय वरी तर

भाकर लागली बरी। पाडाचा अंबा महादेवाला वाहिला। व्याह्यासाठीं विहिणीसाठीं खानदेश पाहिला।

(९१) ऐका आणा सांगती। लेक शिंद्याची। भाची दिवल्याची। मेहुणी सावळ्याची। खालं पेडगांव। वरलं पेडगांव। मधीं चाललं भीमाचं नांव। पागाचं पारगांव। शिंदेकरांचं आडळगांव। दाभाड्याचं तळेगांव। चिंचपूर माझं माहेर। नाना सखा महादु माझं भाव। विडसांगीं माझं गांव। जिजाबाई माझं नांव। जिल आणा येईना तिनं टाळी ठोकून दाव। बर पटतं कां देऊं बटाट?

नवऱ्या मुलीला ओटींत घालतांना—म्हणजेच पांढरपेशांच्या प्रथेंत बोलावयाचें तर कन्यादानाचे प्रसंगीं स्त्रिया खालील गाणें म्हणतात. मुलगी आपल्या घरून गेली म्हणून आई, बाप, भाऊ वगैरे दुःख करतात. त्यांचें सांत्वन करतांना मुलीवर आपण केलेली माया व्यर्थ गेली, ती ज्याची होती, त्यानेंच नेली हें व्यावहारिक तत्त्वज्ञान सांगितलेलें आहे. जावयाला चोर म्हटलें आहे.

(९२) झालुबाई झालु[1]। झालूंत होती जाई। नको रडूं नवरीच्या आई। ज्याची होती त्यानं नेली। आपली माया व्यर्थ गेली।

झालूबाई झालू झालूंत होता चांफा। नको रडूं नवरीच्या बापा। ज्याची होती त्यानं नेली। आपली माया व्यर्थ गेली।

झालूबाई झालू झालूंत होती येणी। नको रडूं नवरीच्या वहिणी। ज्याची होती त्यानं नेली। आपली माया व्यर्थ गेली।

झालूबाई झालू झालूंत होता ओवा। नको रडूं नवरीच्या भावा। ज्याची होती त्यानं नेली। आपली माया व्यर्थ गेली।

---

१. कन्यादानाचे वेळीं झाल धरण्याची प्रथा पांढरपेशा वर्गांतहि आहे. महार समाजांतही नवरीला ओटींत घालतांना पांच सवाष्णी तिच्या डोक्यावर झाल धरून हें गाणें म्हणतात.

**झालूबाई झालू झालूंत होतीं बोरं । मायबाप झाली चोरं[1] ।**
**ज्याची होती त्यानं नेली । आपली माया व्यर्थ गेली ।**

**परसदारीं होतीं बोरं । तिजवर बसला जावई चोर ।**
**ज्याची होती त्यानं नेली । आपली माया व्यर्थ गेली ।**

लग्नांतील आणखीहि कितीतरी प्रसंगांवरील गाणीं रचलेलीं असतात, व तीं त्या त्या वेळीं गाइलीं जातात. अशीं तुरळक गाणीं मिळालीं आहेत, तीं खालीं देत आहे. हीं गाणीं प्रामुख्यानें महार व चांभार जातींतील आहेत.

'सीमांतपूजनाचे' वेळीं म्हणजेच नवरा मुलगा शिलंगणाला जातो, तेव्हां या जमातींत त्याची हजामत केली जाते. भोंवतालच्या स्त्रिया त्याचे-समोर विड्या धरून खालील गाणें म्हणतात. 'विड्या मोडण्याची' प्रथा पूर्वी पांढरपेशा जमातींत होतीच.

**(९३) सोन्याचा वस्तरा। न्हावीदादा तूं चतुरा। हळूंच चुचकारा।**
**लक्ष्मीआई घरी घडी। तेलणीची विडी।**
**सोन्याचा वस्तरा। न्हावीदादा तूं चतुरा। हळूंच चुचकारा।**
**खंडोबा घरी घडी। तेलणीची विडी।**

(याप्रमाणें "लक्ष्मीआई" च्या जागीं "खंडोबा", "मरी आई" इत्यादि दैवतांचीं नांवें घालून गाणें वाढवितात)

या श्रमिक जमातींतून नवऱ्या-नवरीला परटीण हळद लावते. त्या वेळीं स्त्रिया खालील गाणें म्हणतात. परटीण हळद लावते, म्हणून तिचा 'मान' असतो.

**(९४) सोन्याचा नांगुर। रुप्याचा फाळ। नंदीजी जुपिला।**
**सरीजी सोडिली। वाखुरी सोडिली।**
**रुप्याचा जी नाडा। सोन्याच्या जी मोटा। नंदीजी जुपिला।**

---

१. मुलीचे पैसे घेऊन आई-बाप तिचें लग्न करून देतात, म्हणून त्यांना चोर म्हटलें आहे.

**मोटाजी हाणील्या। हळदाई लावील्या।**
हळदाई उगविली। हळदाई आली एक पान। मंग आलीं दोन पानं।
मंग आलीं तीन पानं।
चौथ्या पांचव्या पानाला। हळदाई मोडिली। हळदाई वेचिली।
सोन्याची चुलवण। रुप्याच्या काहिली। हळदाई शिजविली।
हळदाई वाळविली।
सोन्याचा वरवंटा। रुप्याचा पाऽटा। हळदाई वाढिली।
लाविली आर्धी। पंढरीच्या देवा।
आर्धी मान कोणायाचा। नवऱ्यानवरीचा।
दुसरा मान कोणाचा। वरमाईबाईचा।
तिसरा मान कोणाचा। कुरवल्याबाओीचा।
चौथा मान कोणाचा। वऱ्हाड्या बायांचा।
पांचवा मान कोणाचा। परटिणीबाओीचा।

नवऱ्याला पेहराव चढवीत असतांना खालील गाणें गातात.

**(९५) नवऱ्या पेहराव कशायाचा? नवऱ्या पेहराव कड्यायाचा।**
**करंड खोलीला कुसरीचा।**
**नवऱ्या पेहराव कशायाचा? नवऱ्या पेहराव तोड्यायाचा।**
**करंड खोलीला कुसरीचा।**

(यापमाणें धोतर, मंदील, साखळी वगैरे सर्व कपडे व दागिने घालून गाणें वाढवितात)

नवऱ्या मुलीला कांकण बांधतांना म्हणतात...

**(९६) ताग ताग तागून ये। बारीक सूत पाजून ये।**
**कांकणाचा दोर आवळ करावा।**

नवऱ्या-नवरीला बसवून त्यांना एकमेकांच्या गळयाला हात लावायला सांगतात. याला ‘दावी लावणें’ म्हणतात...

## (९७) नवऱ्या नवरीचं कौतिक पहाता । दावी घेत्याती एकमेकां

लग्न लागल्यानंतर वरात होऊन नवरी मुलगी नवऱ्याच्या घरीं जाते. त्या वेळीं नवऱ्या मुलाला अडवितात व नवरी नेऊं देत नाहींत. नवरी-कडील माणसें, वऱ्हाडी, वेसकरी, मुलीचा मेहुणा, बहीण, वरमाय ( वधूमाय असावी ) व शेवटीं देव नवऱ्याला अडवितो. मग नवरीकडील सर्व मंडळींना नवरा कांहीं ना कांहीं देण्याचें कबूल करतो. वऱ्हाड्यांना जेवण कबूल करतो व शेवटीं देवाला गोंधळ घालण्याचें कबूल करतो. मग नवरीला सर्वजण सोडतात.

## (९८) नवऱ्या नवरी कशी नेशील ?

नवऱ्याचा बाप । नवऱ्याचा बाप । गेला फलटण शहरांत ।
गेला फलटण शहरांत ।
केली मेण्याची किंमत । नवरी बसविली मेण्यांत ।
आणली नवऱ्याच्या शिवेवर । शिव धरली शिवाऱ्यानं ।

नवरीकडील माणसें म्हणतात :—

" नवऱ्या, नवरी कशी नेशील ? "
नवरा:—चोळी पातळ देईन । नवरी जितून नेईन । "
तिथनं नवरा निघाला । आला येशीच्या जवळीं ।
येस धरली येसकरांनीं ।
" नवऱ्या नवरी कशी नेशील ?"
" पांच पानं विडा मी देईन । नवरी जितून नेईन । "
तिथनं नवरा निघाला । आला मांडवाजवळीं ।
मांडव धरला वऱ्हाड्यांनीं ।
" नवऱ्या नवरी कशी नेशील ? "
" वऱ्हाड जेवण मी घालीन । नवरी जितून नेईन । "
तिथनं नवरा निघाला । आला बोहल्याजवळीं ।
बोहलं धरलं मेहुण्यांनीं ।

" नवऱ्या, नवरी कशी नेशील ? "
" तुमचा कान मी धरीन। तुम्हांला पटका मी देईन।
नवरी जितून नेईन। "
तिथनं नवरा निघाला। गेला बोहला चढूनी।
बसला नवरीच्या बाजूला। नवरीची बाजू धरली बहिणींनीं
" नवऱ्या, नवरी कशी नेशील ? "
" तुम्हाला चोळी मी देईन। नवरी जितुनी नेईन। "
तिथनं नवरा निघाला। गेला उंबऱ्याजवळीं।
उंबरा धरला वरमाईनं।
" नवऱ्या, नवरी कशी नेशील ? "
" वरमाय साडी मी देईन। नवरी जितुनी नेईन। "
तिथनं नवरा निघाला। गेला देव्हाऱ्याजवळीं।
देव्हारा धरला देवानं।
" नवऱ्या, नवरी कशी नेशील ? "
" देवा गोंधळ घालीन। तुझा गजर करीन। नवरी जितुनी
नेईन। "

या गाण्यांतून लग्नांतील व्याही-विहीण म्हणजे भाऊ बहीणच असतात ही गोष्ट प्रत्ययास येईल. भावाची मुलगी व बहिणीचा मुलगा असें लग्न अनेक जमातींतून प्रचलित आहे. म्हणूनच वरात करून आल्यानंतर व्याही विहिणीचे खालील संवाद म्हणजे बहीण-भावांतील संवाद आहेत. सुनेला घरांत आणतांना सासू देखील मेणा आणीन, रस्त्याला झाडें लावीन व मुलीला वाटेंत तहान लागेल तर विहीर पण खंदीन या सर्व गोष्टी कबूल करते.

## (९९) नवरी जितुनी नेईन

भाऊः–" गहूं पेरला गव्हाळींत।
गव्हासारखी तिची लोंबी। दार धरून कां ग उभी ? "
बहीणः–" दादा, लेकी मागण आलें। "

भाऊः–" तुझ्या लेकीचं लेणं काय ? "
बहीणः–" घालीन साखळयाचा जोड । नवरी जितुनी नेईन ।"

( सर्व दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवितात. )

## ( १०० ) नवरी जितुनी नेईन

भाऊः–" सोन्याचा करदोडा । लवत खवत । कोण पाव्हणी येतीया । "
बहीणः–" दादा, नव्ह मी पाहुणी । दादा, तुमची बहिणाई । "
भाऊः–" कां हो अक्का, येणं केलं ? "
बहीणः–" दादा, लेकी मागण आलें । "
भाऊः–" आक्का दुरुलाग पला[1] । लेकी पायच दुखत्याल । "
बहीणः–" मी मेणाच करीन । नवरी जितुनी नेईन ।। "
भाऊः–" सोन्याचा करदोडा । लवत खवत । कोण पाव्हणी येतीया ?"
बहीणः–" दादा, नव्ह मी पाहुणी । दादा, तुमची बहिणाई । "
भाऊः–" कां हो आक्का, येणं केलं ? "
बहीणः–" दादा, लेकी मागण आलें । "
भाऊः–" आक्का, दुरुलाग पला । लेकी ऊनच लागल । "
बहीणः–" सडक झाडं मी लावीन । नवरी जितुनी नेईन । "
भाऊः–" सोन्याचा करदोडा लवत खवत । कोण पाव्हणी येतीया ?"
बहीणः–" दादा, नव्ह मी पाहुणी । दादा, तुमची बहिणाई । "
भाऊः–" कां हो आका, येणं केलं ? "
बहीणः–" दादा, लेकी मागण आलें । "
भाऊः–" आका, दुरुलाग पला । लेकी तहानच लागल । "
बहीणः–" आडवी बारव[2] खंदीन । नवरी जितुनी नेईन । "

---

१. दूर पळ. २. विहिर.

खालील गाणें असेंच भाऊ, बहीण, व भावाची बायको यांच्यामधील संवाद आहे. परंतु हा संवाद वरातीचे वेळचा वाटत नाहीं. बहीण भावाची मुलगी आपल्या मुलासाठीं मागण जाते, तेव्हांच भाऊ बायकोला विचारतो. ती गोष्ट टाळण्याचे दृष्टीनें बायको उत्तर देते "सातवी मुलगी झाल्यावर वन्संच्या घरीं देईन" होंजी म्हणजे वहिनी या ठिकाणीं वन्संच्या ऐवजीं "होंजी" हें चुकून पडलेलें दिसतें.

## (१०१) आका लेक मागते

**बहीण:—**

**दारीं होती जाई । तिला बांधली गाई । दादा लेक देतो तिला हातच नाहीं ।**
**दारीं होती जाई तिला बांधली गाई । दादा लेक देतो तिला पायच नाहीं ।**

(याप्रमाणें सर्व अवयवांवरून बहीण म्हणते—नंतर भाऊ बायकोला विचारतो)

**भाऊ:—**

**"आका लेक मागते । कसं करावं ग ? ।"**

**बायको:—**

**"होईन सातोदरीं[1] । मंग देईन होंजीच्या घरीं ।"**

# डोहाळे व पाळणे

स्त्रीच्या जीवनाच्या विकासाचा प्रत्येक टप्पा हा एक कौतुकाचा विषय असतो. मुलगी वयांत आली व तिला न्हाण आलें म्हणजे ती एक कुतूहलाचा विषय बनत असते. सर्व साधारण कुटुंबांत व समाजांत मुलीच्या आयुष्यांत हे जे बदलते टप्पे येतात या सर्वांच्या भोंवतीं त्या त्या

---

१. सात-उदरीं = सातवी खेप.

वेळच्या परिस्थितीला धरून असे समारंभ व प्रथा परंपरेनें आंखलेल्या आहेत. अगदीं लहान वयांत लग्न होई त्या वेळीं लग्नानंतर ज्या वेळीं मुलीला ऋतुप्राप्ति होत असे त्या वेळीं गर्भाधानाचा विधि हा सर्व समाजांतून केला जाई. सासरीं आलेली सून त्या दिवशीं प्रथम नवऱ्याची माडी चढत असे. त्या दिवशीं तिच्यासाठीं गोडधोड करणें, कपड्या-दागिन्यांनी तिला नटविणें यांत तर सर्व स्त्रिया आनंदानें भाग घेतच पण नवऱ्याच्या खोलींत ती गेल्यानंतर दार लावून दाराच्या फटींतून या स्त्रिया कौतुक पहाण्यांत संकोच मानीत नसत. न्हाणुलीच्या किंवा गर्भाधानाच्या ओव्या अशा प्रसंगांतून रचल्या गेलेल्या आहेत. न्हाणुलीचीं गीतें देखील सर्व समाजांतून प्रचलित आहेत आज त्यांतील फारच थोडीं उपलब्ध आहेत. रुक्मिणीचें न्हाणावरील एक गीत नागपंचमीच्या फेरावरील गीतांत दिलेंच आहे. " मानसगीतसरोवर " या पुस्तकांतही जानकीच्या न्हाणावर असेंच एक गीत आहे. न्हाण आलें म्हणजे सासूला किंवा आईला " मुका नातू झाला " असें म्हणण्याची प्रथा आहे. म्हणजे नातू होण्यास ती आतां समर्थ झाली असाच अर्थ आहे.

स्त्रीचें गर्भारपण व बाळंतपण हेहि असेच कौतुकाचे विषय झालेले असतात. या प्रसंगांतील निसर्गाची करणी ही खरोखरी कुतूहल निर्माण करणारी अशिच असते विशेषतः पहिलें गर्भारपण व पहिलें बाळंतपण हा कुटुंबांत एक अत्यंत आनंदाचा प्रसंग मानतात व सोहाळ्यानें तो साजरा करितात. गर्भवती स्त्रीच्या पोटांतील गर्भ वाढत असतांना तिला ज्या निरनिराळ्या इच्छा किंवा वासना होत जातात त्या सर्व कुटुंबांत काळजीपूर्वक सांभाळल्या जातात. गर्भारपणीं स्त्रीला होणारे डोहाळे हे तिच्या भावी अपत्याच्या तेजस्वितेचे किंवा स्वभाव-वैशिष्ट्याचे द्योतक असतात अशी कल्पनाहि आपण पाहतों.

ज्या महार समाजांतून खालील गीतें गोळा केलीं त्या समाजांत डोहाळे देखील ' पाळणे ' या नांवानेंच संबोधिले जातात. खालील गीतें हीं डोहाळ-गीतें आहेत. त्यांतून स्त्रीचे डोहाळे वर्णन केलेले आहेत. कित्येकदां यमक प्रास जुळविण्याकरितांच केवळ वेगवेगळ्या कल्पना दिसतील. तिसऱ्या

गीतामध्यें प्रत्येक महिन्यांत गर्भवती स्त्रीमध्यें होणारा बदल मार्मिकतेनें वर्णन केला आहे. कुटुंबांतील प्रत्येक जण गर्भवती स्त्रीचे डोहाळे पुरविण्यासाठीं झटतो आहे असें वर्णन आढळेल.

## ( १ ) नऊ महिन्यांचा पाळणा :

पहिल्या माशीं आई पुशीती । लेकीबाईच डोहाळ कस ? ।
आमच डोहाळ पुरवीजी आई । ओल्या न्हाणीवर लावावी
जाई । जु बाळा जु बाळा जुजुरे ।
दुसऱ्या माशीं बाप पुशीतो । लेकीबाईच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी बापा । ओल्या न्हाणीवर लावावा
चाफा । जु बाळा......
तिसऱ्या माशीं बहिण पुसते । बहीण तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी बहिणी । सोडावा बुचडा घालावं
पाणी । जु बाळा......
चवथ्या माशीं भाऊजी पुशी । बाहिणी तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी भावा । बाजारीं जाऊन आणावा
मेवा । जु बाळा......
पांचव्या माशीं सासरा पुशी । सून तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी सासऱ्या । मळ्याला जाऊन
आणाव्या उसऱ्या[1] । जु बाळा......
सहाव्या माशीं सासू पुशीते । सूनबाइच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी सासू । मळ्याला जाऊन आणावा
उसू । जु बाळा......
सातव्या माशीं नणंद पुशी । वहिनी तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी वइन्स । मळ्याला जाऊनी आणावीं
कणसं । जु बाळा......
आठव्या माशीं दीर पुशीतो । वहिनी तुमच डोहाळ कस ?

१. वाळवून ठावलली रताळीं.

आमच डोहाळ पुरवीजी दीरा । पाडावी न्हाणी बांधावा
चिरा । जु बाळा......
नवव्या मासीं कंथजी पुशी । राणी तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी कंथा । झालाया पुत्र हरली चिंता ।
जु बाळा......

(२)

सासुजी पुशी सासुजी पुशी । सून तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी सासू । खंदावी न्हाणी बांधावा कुसु ।
जु जु रे जुजु ।
सासरा पुशी सासरा पुशी । सून तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी सासऱ्या । खंदावी न्हाणी बांधावी
ओसरी । जु जु......
दीर जी पुशी दीर जी पुशी । वहिनी तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी दीरा । खंदावी न्हाणी बांधावा तुरा ।
जु जु......
जाऊ जी पुशी जाऊ जी पुशी । बाई तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी जाऊ । सरो बिंदल्या धेउनी जाऊं ।
जु जु......
भ्रतार पुस भ्रतार पुस । राणी तुमच डोहाळ कस ?
आमच डोहाळ पुरवीजी भ्रतारा । खंदावी न्हाणी बांधावा
वाफा । जु जु......
( महार स्त्री—सातारा जिल्हा )

(३)

पहिल्या मासीं उभी मी इंद्रवर्गी[2] । डाव्या कुशीला चक्रपाणी ।
जू जू जू जू ......

---

१. जागा. २. इंद्रायणी नदीवर.

दुसऱ्या मासीं उभी अंगणांत । डाव्या कुशीला रघुनाथ ।
जू जू जू जू जू

तिसऱ्या मासीं वरणाचा येतो वास। माझ्या मैनाला गेला
दिवस । जू जू जू जू जू......

चवथ्या मासीं हिच्या तोंडावर लाली । कुण्या महिन्यामधीं
नहाली[1] ? जू जू जू जू जू......

पांचव्या मासीं हिची नीरी दिसं उंच । हिचा भरतार
एकांतीं पुस । जू जू जू जू जू......

सहाव्या मासीं सहाइ चोळया लेऊं । अंजीरबागमधीं जाऊं ।
जू जू जू जू जू......

सातव्या मासीं मनसा[2] झाली डाळिंबाची । चोळी शिवा
रेशमाची । जू जू जू जू जू......

आठव्या मासीं हिच्या आईला[3] मूळ कुणी धाडा । तिला मेण्यांत
वसवुनी आणा । जू जू जू जू जू...

नवव्या मासीं सुईणीला घरा हातीं । मैना परसुत झाली रात्रीं ।
जू जू जू जू जू...

दहाव्या मासीं तिकडून आला वाणी । त्यांनीं लुटिली बत्तीस
गोणी[4] । जू जू जू जू जू...

आकराव्या मासीं तिकडून आला कासार । तिच्या चुड्याला दिला
इसार । जू जू जू जू जू...

बाराव्या मासीं तिकडून आला शिंपी । तिच्या मखराला जाळी
गुफी । जू जू जू जू जू....

तेराव्या मासीं तिकडून आला माळी । हिच्या मखराला केळी ।
जू जू जू जू जू...

---

१. स्त्रिया विचारतात. २. मनीषा. ३. बोलावणें. ४. बत्तीस गोणी साखर.

खालील डोहाळगीत हें सात महिन्यांचेंच आहे:—

## ( ४ ) कृष्णाचा पाळणा :

पहिल्या दिवशींचा पहिला मासोळा । गर्भ्या नारीचा ग रंग पिवळा
पिंड घडवितो कृष्ण सावळा । जू जू रे जु जु ॥ १ ॥
दोनव्या महिन्या पद्र बंद । चोळी पातळावर काढिला चांद ।
आई बापाशीं झाला आनंद । जु जु रे ॥ २ ॥
तीनव्या महिन्या कंथाला ठाव । हळदीकुकुवानं ललाट ल्यावं ।
ओटी भरुनी खोबरं घ्यावं । जु जु रे जु जु ॥ ३ ॥
चवथ्या महिन्या कुसव चढ । अन्नपाणीशीं लागना ओढ ।
कवळ्या पानाशीं बांधीती विडा । अबीर बुक्क्याचा उडवीती पुडा ॥ ४ ॥
पांचव्या महिन्या पांच फेर न । बाळ देवाशीं जात शरण ।
सांडलं मोती घ्याव भरून । जु जु रे जु जू ॥ ५ ॥
सहाव्या महिन्या सया सक्राती । चोळी पातळावर इच्छा पुरवीती ।
देवीला गोपा मागूनी घेती । जु जु रे जू जू ॥ ६ ॥
सातव्या महिन्या सात फेर न । कमरा बांधीती पोलादी विळा ।
कडो पाजिल्या लिंबाच्या डहाळ्या । बाळाच्या मुखीं अफूचा गोळा । जु जु रे जू जू ॥ ७ ॥

पांढरपेशा वर्गातील गेल्या पिढींतील स्त्रियांनीं सुभद्रेचे डोहाळे, सत्यभामेचे, डोहाळे, रुक्मिणीचे डोहाळे अशीं अनेक डोहाळगीतें रचलीं आहेत. ‘ मानसगीत सरोवर ’ वगैरे पुस्तकांत तीं सांपडतील.

बारशाचा पाळणा महार समाजांतून गीतें मिळवितांना एकच मिळाला तो खालीं दिला आहे. कृष्णाच्या या पाळण्याच्या दोनतीन आवृति थोड्या फार फरकानें सांपडल्या. कृष्णाच्या कथेला धरूनच हा पाळणा रचलेला

आहे. पण पुत्रजन्माच्या सर्वसाधारण आनंदाचें व समारंभाचेंही त्यांत वर्णन आहे. सवाष्ण स्त्रियांनीं त्या दिवशींचें महत्त्व, सटवीचें आगमन, इत्यादि प्रथांचाही त्यांत उल्लेख आहे.

**( ६ ) कृष्णाचा पाळणा :**

**पहिल्या दिवशीं जल्मिलं बाळ । कळस सोन्याचा देतोया ढाळ ।**
**पडला परकाश तिनीया ताळ । दिप्ती नेत्तर दोनीया डोळ ।**
**कंसा मारीला बाळाचा काळ । करील भक्ताचा परतपाळ ।**
**जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ १ ॥**

**दुसऱ्या दिवशीं दुसरा रंग । रूप सावळं गोऱ्याचं अंग ।**
**जसं चमकतं आइन्यांतलं भिंग । नागिनी पद्मिनी[1] झाल्यात्या दंग ।**
**येव्या गवळणी बाळाच्या संग । श्रीकृष्ण बाळावर शिंपीती रंग ।**
**जु बाळा जु बाळा जु जु रे ॥ २ ॥**

**तिसऱ्या दिवशीं आनंद मोठा । शीता सावित्री बायांनो ऊठा ।**
**दान धरम गाईच्या पेटा । खारीक खोबरं साखर वाटा ।**
**आयो[2] नारींनो आवा[3] ग लुटा ।**
**जु बाळा जु बाळा जुजू रे ॥ ३ ॥**

**चवथ्या दिवशीं चवथी करीती । आठ रंगाच्या बोलावून नारी ।**
**पाळणा बांधीला यश्वदा घरीं । त्याला लाविली रेशमी दोरी ।**
**जु जु म्हणून हालवितो हरी । पाळणा गातात न्हानाल्या पोरी ॥**
**जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ ४ ॥**

**पांचव्या दिवशीं पांचवा राडा । रानसटवीनं येढीला वाडा ।**
**लिंब नारळ देवीला फोडा । तान्ही वासरं गाईला सोडा ।**
**तिनी सांजाचा अंगारा लावा । तान्ह्या बाळाची दृष्ट हो काढा ।**
**यश्वदा मातेचा जीव थोडा थोडा ।**
**जु बाळा जु बाळा जुजु रे । ॥५॥**

---

१. पद्मिनी, हस्तिनी, चित्रिणी, शंखिनी या चार प्रकारच्या स्त्रियांपैकीं
२. अहेव = अविधवा सवाष्ण ३. सवाष्णींचें वाण.

सहाव्या दिवशीं कळीचा वारा । जशा तुटती अस्मानी तारा ।
ऊठा सयांनों घागरी भरा । चला घेऊन यश्वदा घरां ।
कृष्ण जल्मला मान एक हिरा । राधा घालीति वारा ।
जु बाळा जु बाळा जुजु रे । ॥ ६ ॥

सातव्या दिवशीं सातवीचें मोल । छप्पन रंगाचं काढीलं गोलं ।
चारी बाजूला चारीचं लाल । मधीं चंदन होईल मोल ।
श्रीकृष्ण मांडीवर यश्वदा झुल ।
जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ ७ ॥

आठव्या दिवशीं आठवा थाट । भुलल्या गवळणी तीनशें-साठ ।
दह्या-दुधाचा भरूनी माठ । श्रीकृष्ण बाळाची पहात्यात वाट ।
जू बाळा जु बाळा जुजु रे ॥ ८ ॥

नवव्या दिवशीं नवाच फंद । तान्ह्या बाळानं घेतीला छंद ।
वसुदेवानं सोडवील बंद । धन कीं गवळ्या राजा तूं नंद ।
जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ ९ ॥

दहाव्या दिवशीं दहायासी राती । तेहतीस कोटी देव मिळुनी येती ।

तान्ह्या बाळाला वंदूनी जाती । यश्वदा माता डोळ्यांनीं पहाती ।
ओवाळूनी टाकिती माणिक मोतीं ।
जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ १० ॥

आकराव्या दिवशीं आकरावा गदा । नित्त पाण्याच्या वाटेला उभा ।
सोडावा रस्ता जाऊंदे दादा ।
जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ ११ ॥

---

१. जन्माच्या पांचव्या दिवशीं सटवी येते व मुलाचें विधिलिखित लिहून जाते अशी समजूत आहे.

बाराव्या दिवशीं बारसावळीं[1] । कंसमामाची जळती होळी ।
अनसूयानं वाजिवली टाळी । नांव ठेवावं वनैयामाळी ।
जु बाळा जु बाळा जुजु रे ॥ १२ ॥
(महार स्त्री--सातारा जिल्हा)

## नांव घेण्याचे उखाणे :

नवऱ्याचें नांव उखाण्यांतून घेण्याची प्रथा महाराष्ट्रांत सर्व जमातींतून प्रचलित आहे. पति-पत्नि संबंधांतील मुग्धता हें हिंदी संस्कृतीचें एक वैशिष्टय आहे. त्यामुळेंच पति-पत्नींनीं परस्परांना नांवानें हाका मारण्याची पद्धत नव्हती. मग विशेष समारंभ प्रसंगीं उखाण्यांतून नांव घेण्यानें या मुग्धतेला विशेषच गोडी येई. विशेषतः बायकोनें नवऱ्याचें नांव घेण्याची प्रथा तर सर्रासच आहे. शेतकरी वर्गांत हे उखाणे चांगले लांब असतात. कधीं त्यांतून सर्व नातलगांचा उल्लेख येईल तर कधीं दागिन्यांचा व कपड्यांचा. सर्व सणांची नामावलि घालून तयार झालेले दोन उखाणेहि खालीं दिले आहेत. शेतकरी वर्गांत वर्षांतील कोणते सण महत्त्वाचे मानले जातात व त्यांचीं वैशिष्टयें काय याची कल्पनाहि त्यांवरून येईल.

(१)

दारीं होती तुळस । मला गावला कळस । ते ठेवला केळी खांबीं । केळीचा मऊ गाभा । मी पाडीतें गोड आंबा । आंबा दिला नणदाहातीं । अशी नणंद मनध्यारी । सकाळ उठून करते न्याहरी । अशी जाऊ शहाणी । आठा दिवसांनीं घालते पाणी । दारामधीं आड । वर डाळिंबीचं झाड । त्याचं डाळिंब किती गोड । काय बोललं खासं । मला आलं हसं । हसलें गालच्या गालांत । गेलें रंगमहालांत । विसरलें मायबाप । बहीणभावाची बुजाली सई । रंगमहालाला भिंगाची साई[2] । सोन्याचं कारलं देवाला वाहिलं । × × × × साठीं नांदगांव पाहिलं ।

---

१. बारसें. २. साय = राग.

( २ )

माडीवर माडी । तिथं भरला कौलारी बाजार । दमडीचे घेतले करडी[1] । त्याच्या घेतल्या अरडी[2] । अुरलंसुरलं शिक्या लावलं । शिकं तुटलं मडकं फुटलं । बोघळ गेला देवदारकीं[3] । देवदारकाचा पैका । आणा घालतें एका ।

आणा घालतें एक । देवरामाची लेक
आणा घालती गहीन[4] । तात्याबाची वहीण ।
आणा घालती हौशी । भाअूदादाची मावशी ।
आणा घालती गवळण । पुंजाची मावळण ।
आणा घालती काशी । लक्ष्मणाची भाची ।
आणा घालती लाडी । भिकाची धोडी[5] ।
आणा घालती पावणी । रामाची मेहुणी ।
आणा घालती तान्ही । मारुतरावाची राणी ॥

**सणांचे उखाणे :**

( ३ )

तळूमळू[6] सरावन पोळा । गौरीनं उघडला डोळा । गौरीचीं चित्रं । महाळाचीं[7] पितरं । महालाची निवडली डाळ । आली घटाची[9] माळ । घटाच्या माळेच्या दिल्या गाठी । शिलगणाला[10] आली दाटी । शिलगणाचं सोनं । केलं दिवाळीनं येणं । दिवाळीची पंती । संक्रांत आली नेमकी । संक्रांतीचं सुगाड । नयाच्या[11]

१. करडअीच्या बिया. २. तेल काढण्यासाठीं करडई ३. देवदारी इ. चा भाजून केलेला कुट्टा. ४. गहन. ५. पुतणी. ६. तळण्याचा मळण्याचा. ७. श्रावण पोळा.—शेतकरी लोकांत हा बैलांचा सण मोठा असतो. ८. भाद्रपदांतील पितृपंधरवडा. ९. नवरात्रांत देवीच्या पूजेकरितां स्थापन केलेला घट व त्यावर सोडलेली फुलांची माळ. १०. दसरा ११. माघ पौर्णिमा ( माही पुनव )

पुनवेचं दुगाड । नयाच्या पुनवेचा पुजती पाटा । शिमगा आला गजघाटा । शिमग्याची कांडती सोजी । शिपण्याचा[1] खेळती रंग । पाडवा आला जबरदंग । पाडव्याची उभारती गुढी । मारली आकरितीनं[2] उडी । आकरितीचं पुजती कर । वेंदापावतर[3] दम धर । वेंदाचा पुजूं बैल । लाडवांत लाडू । साडवांत साडू । ×××

( ४ )

वड सावित्रीचा पुजती वड । वेंद्रानं केला चढ । वेंद्राची येती काव[4] । आली पंचम[5] धाव । पंचमीचा पुजतें नाग । आला गौराईला राग । गौराईचीं करतें धावनं । गणपती आलं पावणं । गणपतीची निवडतें डाळ । आली घाटाची माळ । घटाच्या माळेला देतें गाठी । शिलगणानं केली दाटी । शिलगणाचं घेती सोनं । देवदिवाळीनं केलं येणं । दिवाळीची पुजती पंती । संक्रांत आली नेणती । संक्रांतीचें पुजतें सुगाड[6] । माहीपुनं आली दुगाड[7] । माहीपुनाची चोळली ओंबी । शिमगा खेळतो झोंबी शिमग्याची मळतें कणीक । रंगपंचमी आली आणीक । रंगपंचमीचा उडवतें रंग । पाडवा आला जबरदंग । पाडव्याची उभारतें गुढी । आक्रितीनं मारली उडी । आक्रितीचा पुजतें करा । ××× चं नांव घ्या माझ्या चंद्राबाईच्या लग्नापवतर दम धरा ।

खालील उखाणे लहान आहेत—पति हाच देव ही कल्पना रूढ असल्यानें त्याचें कौतुक सर्वत्र दिसेल. त्याच्यासाठीं वाटेल तें करण्याची पत्नीची तयारी असते. इतकेंच काय पण नायकिणीच्या घरीं जाणाऱ्या नवऱ्याचेंहि कौतुक करून त्याला वारा घालणारी स्त्री म्हणजे स्त्रीच्या दास्यत्वाचें प्रतीक आहे.

---

१. रंगपंचमी. २. आषाढी एकादशी ३. वेंदूर = पोळ. ४. गेरू ५. नागपंचमी. ६. संक्रातीला किंवा वडपौर्णिमेला द्यावयाचें सुगाड = मडक्यांत हरबरा, उंस, गाजर इ० घालून सवाष्णींना देतात. ७. दुघड = हट्टी.

हंड्यावर हंड सात । वरल्या परातींत भात । भातावर तूप । तुपासारखं रूप । रूपासारखा जोडा । चंद्रभागेला पडला वेढा । चंद्रभागेंत चालल्या नावा । उठा उठा ×××× मला पंढरपूर दावा ।

( ६ )

पंढरपूरचीं पातळं । तुळजापूरचीं धोतरं । धोतराचा चटका[1] । बाळपणाचा पटका । पटक्याची लेंडी[2] । अष्टपुरांत शिवली बंडी । बंडिकाची बंडिका । तांब्याचीं तामपत्रं दारांत । चला जाऊं थोरांत[3] । थोराच पाणी अटलं । लिमळा गांवांत तीन दिवस नाहीं कटलं । वर्दी आली मुंबईची । मुंबई पाहिलं । पुणं पाहिलं । बडोदं राहिलं । बडोद्याला लागतो पैका । ×××× चं नांव घेती समस्त मंडळी ऐका ।

( ७ )

झुमझुमक येत होतें । खिडकीवाटे पहात होतें । खिडकीला तुणतुणा । अडकित्याला घुंगरं बारा । हंडा मोडितें खांडांसाठीं । रुपया मोडतें पानासाठीं । येवढं सायास कुणासाठीं । ××××च्या जिवासाठीं ।

( ८ )

तुण तुण तुरा । अडकित्याला घुंगरं बारा । ×××× जात्यात कळवातिणीच्या घरा । पानं खात्यात कराकरा । मी घालतें शेल्याचा वारा ।

( ९ )

झण झण झण्यांत । बसलें मेण्यांत । गुलाल भांगांत । कसर चोळी अंगांत । मास मुठींत । खोबऱ्याच्या वाटींत । लवंगाच्या घाटींत । उपर पासोडीचं सोडलं सोगं । ×××× कचेरीला उभं ।

---

१. चांगलें धोतर. २. गुंडी. ३. नदी.

( १० )

**झरझरी खमीस। त्याला कोथमिरी खिस। × × × × जिथं बसं तिथं चांदसुर्व्या दिसं।**

( ११ )

**कणकण कुदळी मणमण माती। पोतरल्या भिंती। चितारले खांब। सासुबाईच्या पोटीं जलमले × × × × राव। सोव.**

# बायांचीं गाणीं

व्रतवैकल्यांप्रमाणेंच रोगराइशींदेखील लोकवाङ्मयानें सांगड कशी घातली आहे हें बायांच्या गाण्यांवरून दिसेल. देवी हा महाभयंकर रोग झालेला मनुष्य भयाण दिसतो. त्याच्या अंगाची आग आग होते. अशा या भीषण रोगाचें निदान व त्यावरील उपाय वैद्यकशास्त्रानें शोधण्यापूर्वी लोकांनीं आपापल्या कल्पनांप्रमाणें रोग झालेल्या माणसाला उतार पाडण्याचे दृष्टीनें प्रयत्न केले. घरांत हा रोग आला म्हणजे घरांत देवीचें प्रत्यक्ष आगमन झालें ही कल्पना. या देवीला सर्व तऱ्हेनें शांत करावयाचें म्हणजेच रोग आलेल्या माणसाला शांत करावयाचें. मग तो मनुष्य जो छंद घेईल तो पुरा करायचा. तो मागेल तो जिन्नस त्याला द्यावयाचा म्हणून या गाण्यांतून बायांसाटीं फुलें, फळें, कपडे, दागिने आणल्याचे उल्लेख आढळतात.

बाया आलेल्या घरांत घट पुजायचा. एकवीस दिवस पूजा करून मग बाया उतरूं लागतांच नदीवर समारंभानें जावयाचें हें दृश्य आपण अशिक्षितांच्या घरांतून पहातों. रात्ररात्र मोठ्यानें वाजंत्री वाजवणें, अंगांत येणें हे प्रकारही आढळतात. देवी आलेल्या माणसाच्या अंगाची लाही लाही होत असतांना त्याचें लक्ष कुठेंतरी वेधून घ्यावें हा या वाजंत्रीमागील हेतु असतो असा खुलासा गाणें सांगणाऱ्या एका ब्राह्मण स्त्रीनेंच केला.

महार, मराठा, ब्राह्मण सर्वच समाजांतून बायांचीं गाणीं रूढ होतीं असें दिसतें. यांतील शेवटचीं दोन गाणीं हीं एका ब्राह्मण स्त्रीनें दिलीं आहेत. विशेषतः कोंकण भागांत हीं गाणीं जास्त रूढ असावींत.

पहिल्याच गीतांत फणसाची घेतलेली उपमा सार्थ आहे. देवीनें फुललेला मनुष्य फणसासारखाच दिसतो व या खऱ्याखुऱ्या देवी असल्यानें वरून रूप भयंकर दिसलें तरी आंत अमृताचें साठं असल्याचा उल्लेख आहे.

खालील गीतें महार स्त्रियांकडून मिळालीं आहेत.

## बायांचीं गाणीं

### ( १ )

सकाळीं उठून आळं लाविलं कारलीचं। रामा लाविलं कारलीचं।
लाविल नारळीचं की रोप उगवलं फणशीचं।
फणसा सर्व्या अंगीं काट। रामा सर्व्या अंगीं काट।
सर्व्या अंगीं काट कीं आंत अमृताचं साठ।
आमच्या बायांचा फराळ। रामा बायांचा फराळ।
बाया फराळ करती। रामा फराळ करती।
बाया फराळ करती। की बाया द्वारकेला जाती।
सोन्याच्या आधुल्या। की बाया गुलाल माखिती।

### ( २ )

कुणीकडुनी आला सातजणींचा मेळा।
येऊन का माळी माळ्याला दिला।
माळी काय दचकून जागा झाला।
नाहीं बायांनो माझ्या मळ्यांत पानफुलं।
जाई शेवंती मोगरा डौलविली[१]।
कानीं काप कापला वहु वाळया।

१. फुलला.

नाकीं नथ नथीला बहु टीका ।
गळ्यांत साखळ्या पुतळ्याच्या माळा ।
डबल दंडी येळा येळावर बाजीबंद ।
हातांत गोठपाटल्या म्होर नागमोड्या बांगड्या ।
पायीं पैंजण झांझुरवाळं वाजे ।
किती मी वर्णू या बायांचा सिनगार साजे ।
किती मी वर्णू या बायांचा साज किती मी वर्णू ।

( ३ )

घाटावरनं आल्या बाया कुठं जाता ग या बायांनो ।
आम्ही जातों कोंकणांत श्रीरामाच्या मुलखांत ।
त्यानच्या मुलखांत कशाची मौज त्यानच्या मुलखांत ।
भवतालीं फुलझाडी मधीं पाण्याचा हौद मधीं पाण्याचा हौद ।
रामाई जानकी गिन्यानवंती गिन्यानवंती ।
बाया ओवाळिती दोही दोही हातीं दोही दोही हातीं ।

( ४ )

नित्य पाण्याचा गारवा उगवली दवण्याची काडी उगवली
दवणाची काडी ।
बागेमधीं कौलारी माडी बागेमधीं कौलारी माडी ।
खालून चालली आगीनगाडी खालून चालली आगीनगाडी ।
काय त्या गाडीचा थाट काय त्या गाडीचा थाट ।
डबा जोडून साठ डबा डबा जोडून साठ डबा ।
पुढं काय बायांचा मठ वो तिथं काय बायांचा मठ ।
बाया फराळ करीती बाया द्वारकेला जाती ।
हिरवी पिवळी पातळं बाया खरीदी करीती ।
सोन्याच्या आघोल्या बाया गुलाल मापिती ।
गुलाल मापिती बाया गोण्याजी भरीती ।
गोण्याजी भरीती बाया उधळीत येती ।

( ५ )

सडक बांधली मातीची लोखंडाच्या कांबीची सडक बांधली
मातीची।
वर पसरलं रोळ चालली आगीनगाडी वर पसरलं रोळ।
बाया बसवल्या डब्यांत बाया बसवल्या डब्यांत बाया।
गाडी गेली भिवंडीवरी गाडी गेली भिवंडीवरी।
भिवंडी शहर ग अखंड बाजीबंदरा बोंड।
मुंबई शहर ग भिवदंड वारा लागतो थंड।

( ६ )

आलवणी मालवणी बायांनीं छंद घेतला छंदकरणी।
छंद घेतला बाई छंदकरणी।
सोनारदादा अन सोनारीणबाई।
बायांची नथ झाली की नाहीं ?
आतां देतों मग देतों उशीर झाला।
लाडक्या बायांनीं छंद घेतला।
आलवणी मालवणी बायांनीं छंद घेतला छंदकरणी।
सोनारदादा अन सोनारीणबाई।
बायांच्या बुगड्या झाल्या कां नाहीं ?

( याप्रमाणें इतर दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात. )

( ७ )

आमना जमना टवटवीत आल्या बाया।
नाकांतल्या नथीसाठीं रडत्याल बाया।
अमना जमना टवटवीत आल्या बाया।
गळयांतल्या सरीसाठीं रडत्याल बाया।
( इतर अवयव व दागिन्यांचीं नांवें घालून गाणें वाढवतात. )

(८)

बायांना तोड कुठून आणावे। माहीमचा सोनार बोलवावा।
अंगणीं ओसरीं बसवावा। चंदनाचा पाट टाकावा।
मोरांनीं समया उजळाव्या। कापसाच्या वातीरे बनवाव्या।
समया चारी शिलगवाव्या। त्याच्या उजेडांनीं बनवाव्या।
कापराच्या ज्योती लावाव्या। त्याच्या उजेडांनीं चढवाव्या।
आखाडी कार्तीकी चल गणराया। आल्या गुजरणी बाया।
बायांना येळा कुठून आणाव्या? पुण्याचा सोनार बोलवावा।

(वगैरे वेगवेगळया दागिन्यांचीं नांवें घालून व गांवांचीं नांवें बदलून म्हणणें.)

(९)

मोठ्या घरच्या बाया आमच्या पाण्याला निघाल्या।
पाण्या निघाल्या बाया तिथंच खोळंबल्या।
फुलाच्या बागंमधीं बाया फुलाला खोळंबल्या।
दुधूनच्या[1] तळयावरी बाया आंघोळया करीत्यात।
अंघोळ करीत्यात वो पितांबर नेसत्यात।
पीतांभर नेसत्या येशींत उभ्या राहात्यात।
बाया पाताळाला पाणी वो पातळाला।
पहाटच्या पान्यामधीं बायांचा ढोलकुट वाजतो।
बायांचा छबीना मिरवीतो।
माहीमच्या पेढीवर बायांना तोडे घडवीतो।

(१०)

पिकल्या उमराखालीं बायांनीं डाव जो मांडीला डाव जो मांडीला
बायांचा चौरंग सोन्याचा चेंडू झुगारीला मोत्याचा।

---

1 स्थानिक उल्लेख.

चेंडू कैलासाला गेला चेंडू परतुनी माघारी आला।
करदोळीच्या जाळी करदोळीच्या जाळी तिथं जंभूसंभू माळी।

(११)

हिरवी लवंग इलायची पानाची जंजिरी हिरवी लवंग इलायची।
विडा बनत ग सुंदरी दशरथाची नारी विडा बनव ग सुंदरी।
विडा घेर घे मुखांत काय तुझ्या मनांत
माझ्या मनांत ग जगजेठी राजपणाच्या गोठी॥

(१२)

सातजणी बाया आठवा कान्हा।
मळयांत जातो कळया तोडितो। हार गुफीतो।
लाडक्या बायांना संग घेऊन जातो॥

(१३)

चोळी शिवली अंगणांत बाया झाल्यात रंगणांत।
चोळी ठेविली खुटीला बाया आल्यात भेटीला।
चोळी ठेवली वाटींत बाया आल्या मिठींत॥

(१४)

खालील दोन गीतें कुलाबा जिल्ह्यांतील एका ब्राह्मण स्त्रीनें दिलेली आहेत.

चैत्र वैशाखीं चाफीया फुलाचा गजर भारी।
मी बाई फुलवा पालखी जायाची।
पालखींत बसणार रथ केला तैयार।
सोळा चाकें त्या रथाला वाहन खिडक्या त्याला।
रूळ टाकले दुहीरी वर चाले आगीनगाडी।
बाया बसती काय डब्यामधें नाद गेला पुण्यामधें।

(१४५)

पुणे शहर हो अखंड आणा बायांना गोंड ।
गोंडे आणले कौशी[1]चे बायांच्या हौशीचे ।
चोळीला लावले ते गोंडे चोळी बायांना दंडे ।
चोळी ठेविली दांडीवर बाया आणल्या मांडीवर।
चोळी ठेविली अंगांत बाया आल्या रंगांत ।
सवाखंडी उद बायांच्या घटाला उजळीला ।
त्या उदाचा वास गेला घाटाच्या माथ्याला ।
सासुसासरा बायांना पुसूशीं लागला ।
कोकणी जाउनी बायांनो कायकाय बात केली ।
गरिबांचीं बाळं ग त्यांचीं त्यांना उतरून दिलीं । [2]

( ब्राह्मण स्त्री—कुलाबा जिल्हा )

(१५)

पिवळ्या शेवतीच्या फुलांची आमुच्या बायांची आवड
बाया दादाला सांगती पिवळी शेवती मागती ।
तेथुनी दादा निघाले गेले वसई बाजारी ।
तिथं एक माळीण होती दे मला पिवळी शेवती ।
अरे तूं कुणाच्या मुला पिवळी शेवती कशाला ।
अग मी बायाचा गवळा[3] पिवळी शेवती बायांना ।
अरे तुझ्या बाया कुठें आहेत रे चल जाऊ दाखवरे मजला ।
बाया आहेत पनवेली शहराला चला दाऊं दाखवतो तुजला ।
माळीण आली बायापाशीं दिली पिवळी शेवती ।
बाया हातामधें घेती बाया डोक्यामधें भरीती ।
बाया डोक्यांत घालती बाया आरशामध्यें पहाती ।
बाया आरशामधे पहाती मनीं संतोष होती ।।

( ब्राह्मण स्त्री-कुलाबा जिल्हा )

---

१. कौशय = रेशमी. २. बायांनीं अंगांत येऊन गरिबांचीं मुलें वाचवलीं असा भावार्थ. ३. गबाळ्या = सोवळें नेणारा.

## परिशिष्ट १

# संग्रहांत आलेल्या शब्दांचे अर्थ

**अद्रेमान**–आदरमान (?)

**अरडी**–तेल काढण्यासाठीं करडी वगैरेंच्या बिया भाजून करतात तो कुट्टा.

**अशीलदान**–एका गांवांतून दुसऱ्या गांवांत विक्रीसाठीं माल नेला असतांना त्यावर बसविलेली जकात.

**अष्टण**–अष्टांग स्नान.

**अष्टीचं पातळ**–एक प्रकारचें लुगडें.

**अस्तुरी**–बायको.

**अळींकार**–अलंकार.

**आकडमास**–आषाढ महिना.

**आकरीत**–वेडंवाकडं.

**आक्रीती**–आषाढी एकादशी.

**आयबा**– अहेव स्त्रिया–सवाषिणी.

**आरवाळी**–अरोगट; वात्रट.

**आळका**–हळवा.

**आळशा**–जवस.

**इगडी**–नणंद.

**ईरक्ष**–वृक्ष.

**औसबंध**–त्रीषबांध.

**उजवी घालणें**–प्रदक्षिणा घालणें.

**ऊत्पलदेवी**–उत्पलादेवी–लक्ष्मी.

**उधन्या**–अयोध्या (?)

**उपग्यान**–उपदेश.

**उसऱ्या**-वाळवून ठेवलेली रताळीं

**एकळ**-एक कांटेरी झुडुप.

**ओवरी**–ओसरी.

**अंबुली**–आंब्याचें लहान झाड.

**कचणीची गांठ**–आंवळून बांधलेली गांठ.

**करगती**–शेल्याचा प्रकार.

**कर्तार**–ईश्वर.

**कलनाकोंडा**–धान्याचा चूर (गरिबाचें धान्य)

**कळक**–बांबू.

**कळंब**–कदंबवृक्ष.

**कळींग**–बळीद.

**कांचबंदी**–कांचा बसविलेली फरसबंद जमीन. (हा शब्द शाहिरी वाङ्मयांत रूढ आहे)

**काचोळी**–पाठीला नुसते बंद असलेली चोळी.

**कास**–कासोटा, आंचा

**कासई**–नवें लुगडें.

**किराण साधणें**–नेम मारणें.

**कुपाटी**–कुंपण.

**केकतड**–घायपात.

**केदारी**–कासार.

**कैराव**–कौरव.

**कोथमिरी**–कोथिंबिरीसारख्या बारीक व जाळीदार नक्षीचा (खांबावरील नक्षी )

**कौशीचा** ( गोंडा )–कौशेय–रेशमी

**क्रुद्धानं दाटला**–रागानें लाल झाला.

**खडी** -टेकडी.

**खट**–द्वाड.

**खरग**–खड्ग.

**खिसका**–साडगे, कुरड्या आदींचें पीठ.

**खेडकी**–खेंडकुळी– बागेंतील पाण्याचा लहान पाट.

**खोट**–कोट–तट.

**गवाळ्या**–सोंवळें नेणारा.

**गहीन**–गहन–कठिण.

**गिरास**–ग्रास–ग्रास.

**गुलावा**–भुलावा.

**गोरसमया**–दूधवाल्या.

**गोळ्यासमद बुरूज**–गोळीबुरूज.

**घटाची माळ**–नवरात्रांत देवाच्या पूजेचा घट बसवून त्यावर फुलांची माळ सोडतात ती.

**घाणा भरणें**–लग्नांतील हळद दळतात तो घाणा;

एक घाणा केला–एका बैठकींत दळलें.

**घोंगता**–घोनता–अंगरखा.

**चक्राचा पाट**–चक्राकार नक्षी असलेलें लुगडें.

**चवर**–मोहोर

**चांगुलपणा**–सौंदर्य.

**चैतान**–उत्तान.

**चोर ओटी**–स्त्रीच्या पहिल्या गर्भारपणांत तिसऱ्या किंवा चौथ्या महिन्यांत खाजगी रीतींनें ओटी भरतात ती. स्त्री गर्भार आहे कीं नाहीं हें तीन महिनेपर्यंत निश्चित समजूं शकत नाहीं म्हणून.

**झपका**–झुपकेदार.

**झरझरा** ( रुमाल )–रेशमी.

**झालू**–झाल, लग्नांत कन्यादान करतांना मुलीच्या डोक्यावर पांच सवाष्णी झाल धरतात.

**झिरा**–झरा.

**झेलारी**–झूल.

**टाकळ**–एक औषधी वनस्पति.

**टेकीची**–टेकडीवरची

**ठाल्याठुल्या**–झाडाच्या डहाळ्या, काटक्या.

**टोक घालणें**–ठोके मारणें.

**डगरी**–उंचवटा.

**डगरी ढासळणें**–मोठ्या आवाजांत ओरडणें.

**डांब**–खांब.

**डुबा**–वासरू.

**डौलविला**–फुलला.

**तगारें**–घमेलें.

**तळवट**–खालचा भाग (जमिनीचा)

**ताजवा**—तराजूं.

**तान्हभूक लाडू**—तहानेची व भुकेची शिदोरी.

**तिरडा**—भारा

**तिर्लोक**—त्रैलोक्य.

**दातीं तृण धरणें**—शरण येणें

**दिमा**—डीम—ठमकारा.

**दुघड**—दट्टी.

**दुमत्ता**—दुमडलेला.

**दुर्व्य**—द्रव्य.

**देवई**—देवकी.

**देवसव्यात**—देवांसमवेत.

**दोड**—द्वाड.

**दंडी पदर सावरणें**—पदर आवळणें

**धोंडी**—पुतणी

**नगरमासा**—मोठा मासा

**नांद्रकी**—एक दाट छायेचें झाड.

**निडाळ**—कपाळ.

**नेहर**—किनारा.

**पंचात्री**—पंचारती.

**पटाड**—बैलाच्या पाठीवरील खोगीर ओढण्याचें साधन.

**पलाण**—विहिरीचें पाणी दूर पोंचविण्याकरतां केलेली मातीची वरवंडी.

**पाऊ**—कांठ.

**पाठीचं सोनं**—पाठचीं भावंडें.

**पांढर**—वसाहतीची पांढरी जमीन.

**पानंद**—पाणोठा.

**पेठ**—बाजार.

**पैतार**—पवित्र.

**पुणधर**—पुरंधर.

**पोटीचं सोनं**—लेकरें.

**पोवतं**—श्रावणी पौर्णिमेस देवाला अर्पण करावयाचा दोरा; नागपंचमीला नागाला वाहतात.

**पोलार**—पायाच्या अंगठ्यांतील जोडव्यांसारखा दागिना.

**बसकर**—बसकण, सतरंजी.

**बया**—आई.

**बाजवा**—विहिरीच्या बाजूचे आधाराचें खांब.

**बासन**—भांडें.

**बासरी**—चरवी.

**बारसावळ**—बारसें.

**बिदाई**—खेड्यांतील गल्ली.

**बिचवा**—तंबू.

**बुत्ती**—दहीभात कालवून प्रवासाला बरोबर नेतात तो.

**बुत्तीचा शेला**—ठेवणीचा शेला.

**बुध्या**—बुद्धि.

**बेस**—वेश.

**भिस्की**—पुष्कळ.

**भोकरघाट**-एक प्रकारचीं कर्णभूषणें.

**मखमली मूठ**—बैलाच्या पाठीवरील मखमली मूठीची झूल.

**मन्नाचा घट्ट केला**—मन खंबीर केलें.

**मजकूर**—विचार.

**मनसा**–मनीषा.

**मरणपुवी**–स्मशानभूमि

**मर्तकी**–माती.

**महामोरी**–मोठी.

**महाळाचीं पितरं**–भाद्रपद महिन्यांतील पितृपंधरडा.

**मांगीरसाहेब**–एक स्थानिक दैवत.

**माजुम**–बदाम पिस्ते घातलेली भांग.

**माहीपुनम**–भाद्रपद पौर्णिमा.

**मुऱ्हाळी**–मूळ + हारी = सासरीं मेलेल्या मुलीला माहेरीं नेण्यास आलेला ( हा बहुधा भाऊ किंवा मामा असतो )

**मुलाण्या**–खाटीक.

**मूर्तवेळ**–मृत्युची वेळ

**मूळसाडा**–माहेरीं बोलावणें.

**मेट**–नेट.

**मेढ**–खांब.

**येंगणें**–चढणें.

**येढा**–प्रदक्षिणा.

**येवध**–युद्ध.

**येवश्या**–वेश्या.

**राक्षिणी**–राक्षसिणी

**रुपीण**–रुक्मिणी.

**लगडी**–ओझी.

**लमण**–लमणांची छावणी.

**लटपट झाली**–बेशुद्धावस्था झाली.

**ललईबाग**–लालबाग.

**लेंडी**–गुंडी.

**वग**–लावणीचा सुधारून वाढविलेला प्रकार–नाटक व गायन यांचें मिश्रण.

**वगर**–उग्र, द्वाड.

**वजवज**–उजूं उजूं–पुन्हां पुन्हां.

**वंजणें**–विक्री करणें.

**वळणाव**–वाळवण.

**वाढीदिडी**–दिडीनें वाढणारें.

**विभूत**–राख.

**वोसणें**–चोखून घेणें.

**शिंकीण**–शंख.

**शिणजोड**–योग्य वयाचा.

**शिधु**–शिडी.

**शिनगार**–शृंगार.

**शिमा**–सीमा.

**शिरवळ**–शांत वेळ.

**शिरस**–शिरीष वृक्ष किंवा एक प्रकारच्या मोहरीचें झाड.

**शेका**–शेपाचें झाड.

**शेजी**–शेजारीण.

**शेरीबेरी**–लोण्याच्या खालची खरवड

**शेलाणी**–शेलारी–उंची लुगडें.

**सडसुड**–नाडा.

**सई**–मैत्रीण.

**सरदोरी**–हत्तीच्या गळयांतील घंटेची दोरी.

**सवर्ण**–सुवर्ण.

( प्राचीन उखाणे व भूपाळया ) : अ. रा. गाडेकर

**सातीसलद**-अत्यंत लांब-सातव्या पेटींत.

**साथीसजण** -मित्र.

**सांधींकुंधीं**-कानाकोपऱ्यांत.

**सायाचें**-सागवानाचें

**सारंगपट**-सारीपटाचा खेळ.

**सिंदुरी**-शिदोरी.

**सुगाड**-संक्रांतीला किंवा वटसावित्रीला मडक्यांत उंस, हरभरा, गाजर, इ. घालून सवाष्णींना वाण देतात तें.

**सौंदड**-शमीवृक्ष.

**हरख**-वीष.

**हरळी**-मोठा चर.

**हरोळी**-आरोळी.

**हाट**-बाजार.

**हुरद**-हृदय.

**हेल** -हमाली.

**हेलबाळया**-हालणाऱ्या बाळया.

**हौंजी**-भावजय.

**होळीहोळी**-आवर आवर. ( उद्गार वाचक )

---

### परिशिष्ट २

## लोकवाङ्मयावरील प्रसिद्ध झालेलीं संग्रहात्मक व टीकात्मक पुस्तकें

ओल्ड डेक्कन डेज : मेरी फ्रिअर ( १८६८ )

बॉंबे फोकलोअर : एन्थोव्हेन

स्त्रीगीत संग्रह : निर्णयसागर प्रकाशन ( १८७२ )

कुलीन स्त्रियांसाठीं गाणीं : चित्रशाळा प्रकाशन भाग १ ते ३

मनोरंजक स्त्रीगीत भाग १ ते ३ ,,

मुलींकरतां ओंव्या व गाणीं ,,

हदग्याचीं गाणीं : भ. मा. गोसावी आणि कंपनी.

स्त्रीगीतमनोरंजिका :

भातुकली अथवा मुलींचे अनेक खेळ, ओंव्या, म्हणी (१९१५)

कहाण्या : वि. वा. दिवेकर ( १८८८ )
फुर्डुक वही ( म्हणींचा संग्रह ) : ज्ञानसिंधु छापखाना
म्हणींचें इंग्रजी भाषांतरासहित पुस्तक : ना. प्र. छत्रे ( १८७० )
स्त्रीगीतसंग्रह : निर्णयसागर ( १८८२ )
लोककथा भाग १ व २ : शं. ग. दाते ( १०३० )
लोककथाकुंज : भाग १ व २ पं. महादेवशास्त्री जोशी
लोककथा व लोकगीतें : वि. वा. जोशी ( १०३६ )
कोंकणस्थ अथवा चित्पावन ब्राह्मणांचा
लग्नसमारंभ : राधाबाई केळकर ( १९३६ )
बदलापूर ( आमचा गांव ) : चाफेकर शके १८५५
चंपाराणी : चोरघडे
साहित्याचें मूलधन : ,,
श्रावणसरी : वि. ग. भिडे
मोत्यांचें कणीस : ,, ( १९४७ )
गोड स्त्रीगीतें : महादेवशास्त्री जोशी
लौकिक दंतकथा गो. मं. : कालेलकर
वऱ्हाडी लोकगीतें : पां. श्री. गोरे ( १९४२ )
स्त्रीजीवन भाग १ व २ : साने गुरुजी
अपौरुषेय वाङ्मय : कमलाबाई देशपांडे
लोककथा : प. स. सरदेसाई ( १९४५ )
नागपंचमी व इतर कथा : वा. ना. विगम.
लोकसाहित्याचें लेणें : मालतीबाई दांडेकर

( यांखेरीज " मराठी ग्रंथसूचि " या दाते यांच्या पुस्तकांत स्त्रियांचीं गाणीं ' 'म्हणी' पा. ५९२ व ३०९ या सदरांत अनेक लहान लहान पुस्तिकांची यादी आहे. )

## परिशिष्ट ३

## विषय व व्यक्ति यांची सूची


अपौरुषेय वाङ्मय प्र. २२
अर्जुन–श्रावण
अलंकार प्र. १५, २०, २४
आई प्र. ९, १०, १६–६४, ६५
आजीबाई प्र. ५, २१
आठवले रा. म.
आपटे वा. गो. प्र. २८
इतिहास संशोधक मंडळ प्र. २८
इरावती कर्वे प्र. २८
उखाणा १२०, १२१
उपमा प्र. १५, १७, २०, २४–३
एन्थोव्हेन प्र. २७
ओवी प्र. १, २, ३, ४, ५, ९, १०, ११, १२, १३, १४, १५, १६, १७, १८, २०, २२, २३, २४
कमलाबाई देशपांडे प्र. २२, २८
कहाण्या प्र. ३
काव्यशास्त्र प्र. २, २०
काळी चंद्रकळा प्र. २, ६
किल्ला प्र. १४
कुंटे प्र. २८
कुंति प्र. २९, ३०
कृष्ण प्र. २६– २७, ३८, ३९, ४०, ४१, ४२, ४३, ४६, ४७, ४८, ४९, ६७, १०२
कैकेयी प्र. २५
कोडी प्र. २१
कोंबडा ७५
गणचा ८५
गणपति प्र. ११
गद्यवाङ्मय प्र. २१, २२
गर्भवति १२८
गवळण प्र. २०, २२
गाय प्र. १६– १, २, ६
गोकुळअष्टमी प्र. ११
गोदू प्र. १६
गोविंदा ४४, ४५, ४६, ४७, ६८, ७१
गौराई ५३
गौरी प्र. ११
गंगू सोनू प्र. ८
गंधारी प्र. १६– २८, २९, ३०
घाणा ९४, १०३, १०७
चंद्रावळ ३८, ३९, ४०, ४१, ४२ ४३, ४४, ५१, ५२
छंदःशास्त्र प्र. २, २०
जातें प्र. २, ३, ५, १२, २१, २४
जेम्स कॅंबेल प्र. २७
जैता प्र. ८, २०– २, २१, २२
झिम्मा–६९, ७१
डोहाळे प्र. २२, १२७

तान्हभूक लाडू प्र. १४
तुळस प्र. १३
दाते प्र. २१
दीर प्र. १०– ६०, ६१, ७०, ७६
दुर्गा भागवत प्र. २८, २९
दृष्ट प्र. १३
देवकी ४८, ४९
देवीचीं गाणीं (बाया पाहा) प्र. २२
देह प्र. २२
नणंद प्र. ८– ९, १०
नवरा ६३, ८२, १२४, १२५
नवरी १२४, १२५
नागपंचमी प्र. ९, ७, ११,– १, २, १०
न्हाणुली प्र. ७, २२
पद्यवाङ्मय प्र. २१, २२, ३०
पंडिती वाङ्मय २, ४, १४
पंढरपूर प्र. २६ – ५४, ५५, ५६, ५८, ५९, १०२
पाळणा प्र. २२–६, १२७
पार्वती प्र. २६ – २६, २७, २८, ५२
पावसाळा प्र. ७–१, २
पिंजरा प्र. १४
पिता प्र. १६
पुराणकथा प्र. २४
फुगडी ७१, ७२, ७३, ७४
बहीण प्र. १०, ११, १२, १८– १०, ७२, १२६, १२७
वहिणाबाई प्र. ४
बहुळा प्र. ७–२, ३, ४, ५
बाळाई प्र. ८, १४, २०, २१– २, ९, १०, ११, १२, १३, १४, १५, १६
बाया १३२
भाऊ प्र. ९, १०, ११, १२, १४, १८–१०, ७४, १२६, १२७
भाद्रपद प्र. ११
भारजा प्र. ८, १४, २०–२, ९, १०, १६, १७, १८, १९, २०
भावजय प्र. ८– ९
भावे प्र. २३
भीम २९, ३०
भूतखेत प्र. १, ५, २१
भोंडला प्र. १, २, – ६८
महादेवशास्त्री जोशी प्र. २८
महाराष्ट्र साहित्य पत्रिका प्र. २८, ३०
मामा प्र. १०,–६२
मालण प्र ११
मालतीबाई दांडेकर प्र. २, २३, २८
मावशी प्र. १०
माहेर प्र. ९, १०, ११– २, ५९, ६०, ६१, ६२
मौज प्र. २८
मुराळी प्र. १०–६३
मेरी फ्रिअर प्र. २७
मैत्रीण प्र. १०
मंगळागौर प्र. ११–१०
म्हणी प्र. २१

यशोदा ४९
राई प्र. २५, २७–४४, ४५, ४६ ४७, ५०
राजारामशास्त्री प्र. २७
राधा प्र. २६–५१
राम प्र. ८, १९, २४, २५–३६, ३७, ८२, ९३
राक्षस प्र. २१
रुक्मिणी प्र. २६–५६, ५७, ६४, ९३
रुखवत प्र. २७, १०९, ११०, १११, ११९, १२०
लग्न प्र. ३, ५, ९, ११, १२ २२–९४
लावणी प्र. २०
लेलेशास्त्री प्र. २८
लोककथा प्र. २१
लोकवाङ्मय प्र. १, २, ३, ४, ५, ६, ११, १४, १५, २०, २१, २२, २४, २५, २७, २९–१, ३
लोकसाहित्य प्र. २, २९
" लोकसाहित्याचें लेणें " प्र. २, २३
लोकविद्या प्र. २९
वग प्र. २०, २२, ३०
विठ्ठल प्र. २६–५६
विष्णुशास्त्री चिपळूणकर प्र. २७
विहीण–११०, १११, ११३, ११४, ११५, ११६, ११८, १२०
व्याही ११४. ११५, ११८
व्रतवैकल्यें प्र. ३, ४, –१
शंकर प्र. २६ – २६, २७, २८ ५२, ५३
शंभु ५४, ९३
शत्रु प्र. १३– २२, २३, २४, २५
शिमगा ८१
शेजारीण प्र. १०
श्रावण प्र. १३–१०, ३०, ३१, ३२, ३३, ३४
श्रावण महिना प्र. ११, २०–१०
सखुबाई ३४, ३५
समाज–इतिहास १४, २७
समाजशास्त्र प्र. ५
सरोजिनी बाबर प्र. २८
सर्प प्र. १२
संत प्र. ४, २५
सह्याद्रि प्र. २८
सत्यकथा प्र. २८
साधना प्र. २८, ३०
साहित्य प्र. २८
साने गुरुजी प्र. २२, २३, २८
सारंगपाट
सासर प्र. ९, १०–२, ५९, ६०, ६१, ६३
सासरा–६३, ६४, १३०

सासू प्र. ८, ९, ११ – ९, २२,
२३, २४, २५, ६४, १३०
सासु-सुनेचें गाणें प्र. १३
सीता प्र. २४, २५–३६, ३७, ३८
सून प्र. ८, ९–९, २२, २३,
२४, २५
सूर्य प्र. १४. १७
'स्त्री-जीवन' प्र. २३, २८
हरि ५१, ५५
हरिणी ७, ८
हळद ९४

पुणें विद्यापीठ बहिःशाल शिक्षण मंडळाची

# बहिःशाल शिक्षण ग्रंथमाला

## प्रकाशित ग्रंथ



१. 'जगाचें राजकारण' ....मूल्य तीन रुपये

ले. प्रा. व. मं. सिरसीकर

२. 'वनश्री-दर्शन' ....मूल्य अडीच रुपये

ले. डॉ. म. वि. आपटे

३. 'व्यक्ति-स्वातंत्र्याचा विकास' ....मूल्य दोन रुपये

ले. श्री. मा. प. मंगुडकर

४. 'भारतीय पशू' ....मूल्य अडीच रुपये

ले. सौ. शकुन्तला पोंक्षे



## आगामी प्रकाशनें

६. 'पक्षि-दर्शन' ....

ले. डॉ. म. वि. आपटे

